# वास्तू

## रोहिणी गोरे



Rohini Gore
2416 Strawberry Court,
Edison, New Jersey-08817
U.S.A.

Whatsapp - 1-828-674-8631

Gmail : gore.rohini@gmail.com

Blog address : http://rohinivinayak.blogspot.com /
उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म
http://rvgore.blogspot.com / स्मृति

पूर्वी आईबाबांनी हौशीने काढलेले रंगीत व कृष्णधवल फोटो स्कॅन केले आहेत. आईबाबांच्या नवीन घरातले फुलांचे फोटो मी माझ्या डिजिटल कॅमेऱ्याने काढले आहेत.(cover/back page )

# मनोगत

प्रिय वाचकहो

नमस्कार, मी रोहिणी गोरे. या पुस्तकाबद्दल लिहिताना माझ्या मनात सर्व आठवणी दाटून आल्या आहेत. माझी आई, बाबा, मामा (आजोबा) मी व रंजना असे आमचे माहेरचे कुटुंब. ज्या वास्तूत आम्ही राहिलो तिथे आम्हाला सर्व काही भरभरून मिळाले. पूरग्रस्त चाळीमध्ये आम्हाला मिळालेली जागा कडेला असल्याने बाजूची जमीनही आम्हाला मिळाली. घराच्या समोरच्या अंगणात नित्यनियमीत पाण्याचा सडा व्हायचा. बागेत जाईचा वेल होता. जाईने आम्हाला अगणित फुले दिली. रात्रीच्या अंधारात जाईच्या वेलीवरची पांढरी शुभ्र फुले म्हणजे जणू काही चांदण्याच ! घराच्या बाजूची जागा होती तिथे आईबाबांनी फुलाफळांच्या बागा फुलवल्या !

उन्हाळ्यात वर्षभराची वाळवणं अंगणात व्हायची. या घरामध्ये सर्व प्रकारची धार्मिक कार्ये आईने केलेली आहेत. गणेश याग, अधिक मासामध्ये तीस-तीन सवाष्णी, मेहुणे जेवायला घातली आहेत. आई, बाबा आणि मामा (आजोबा) यांच्या नातेवाईकांचा गोतावळा खूप असल्याने आमच्या घरी सतत ये-जा असायची. गावावरून कोणी आले की ते आमच्या घरीच उतरायचे. पूर्वी ज्या गोष्टीचे अप्रुप होते अशा सर्व गोष्टी या घरात बाबांनी हौशीने आणल्या. रॅली कंपनीचा पंखा, रेडिओ, टेलीव्हिजन, टेप रेकोर्डर. आईबाबा शिकवण्या घ्यायचे. त्यामुळे आमची बाहेरची खोली सतत भरलेली असायची. आई पहिली ते सातवी शिकवण्या घ्यायची तर बाबांकडे आठवी ते दहावी इयत्तांची मुले यायची. बाबा त्यांना इंग्रजी, गणित व शास्त्र शिकवायचे. आई सकाळी ८ ते १०, दुपारी ३ ते ५ शिकवण्या घ्यायची तर बाबा संध्याकाळी कामावरून आले की ६ ते ९ शिकवण्या घेत असत.

अंगणात भोंडला होत असे. घरात येण्यासाठी ज्या तीन पायऱ्या

होत्या त्यावर अनेकदा बसायचो. दरवर्षी चैत्रातले व संक्रांतीचे हळदीकुंकू व्हायचे. दसऱ्याला आपट्याची पाने द्यायला व संक्रातीला तिळगुळ घ्यायला आईबाबांचे विद्यार्थी यायचे. आईने शिवणाचा डिप्लोमा केला होता. तिने बऱ्याच बायकांना शिवण शिकविले. आमचे सर्व कपडे आई घरीच शिवायची. आम्ही दोघी बहिणी जेव्हा लहान होतो तेव्हा मामा (आजोबा - बाबांचे वडिल) आम्हाला गोष्टी सांगत. नंतर बाबा गोष्टी सांगायला लागले. दिवाळीत आम्ही अंगणात रांगोळ्या काढायचो. बाबा हत्ती मोराच्या, निसर्गाच्या रांगोळ्या काढत व आम्ही दोघी बहिणी ठिपक्यांच्या काढत असू. कुणाचे केळवण व डोहाळे जेवण असे तेव्हा बाबा ताटाभोवती सुरेख महिरप काढत असत.याच घरात आमच्या दोघींचे साखरपुडे झाले. आमच्या दोघींच्या लग्नात पाहुणेरावळे आल्याने जेवणावळी अंगणात झाल्या व मंगळागौरीचे खेळ रंगले. रंजनाचे डोहाळेजेवण व सईचे बारसे थाटात साजरे झाले. लग्नानंतर मी डोंबिवलीवरून ४ दिवसाच्या माघारपणासाठी यायचे तेव्हा मला खूप आनंद व्हायचा.

या घरात साजरे झालेले सण मला अजूनही जसेच्या तसे आठवतात. मी, रंजना व बाबा आम्ही तिघे मिळून गणपती आणायचो. पायऱ्यांवर आम्ही तिघे उभे राहिलो की आई आमचे औक्षण करायची. दिवाळीत लावलेला चांदणीचा कंदील, दणक्यात साजरी झालेली भाऊबीज , गुढीपाडव्याला खिडकीत उभारलेली गुढी, हे सर्व आठवले की असे वाटते आपल्या सर्वांनाच हे सण किती आनंद देवून जायचे! आम्हा दोघी बहिणींना आजोबांचा प्रेमळ सहवास लाभला. आईबाबांनी आम्हा दोघी बहिणींच्या हौशी पुरवल्या. आमच्यावर चांगले संस्कार केले. त्यांनी केलेले चांगले संस्कार व आजोबांचा आशिर्वाद आम्हां दोघी बहिणींच्या पाठीशी आहेत यात वाद नाही. हे पुस्तक वाचताना तुमच्या आठवणीही जागृत होतील याबद्दल मला विश्वास वाटतो. वास्तूबद्दलच्या सर्व आठवणी मी माझ्या 'स्मृति' ब्लॉग वर लिहिल्या आहेत. त्या सर्व आठवणी एकत्र करून 'वास्तू' नावाचे पुस्तक प्रकाशित करताना

मला खूप आनंद होत आहे. हे पुस्तक तुम्हाला आवडेल याबद्दल मला खात्री आहे. पुस्तकावरचा अभिप्राय मला तुम्ही जरूर कळवावा ही नम्र विनंती. सोबत तुमच्या काही आठवणी जरूर लिहाव्यात. त्या वाचून मला खूप आनंद होईल

------------*------------

## आई बाबा,

तुम्हां दोघांना “ वास्तू ” पुस्तक समर्पित.

बाबा, तुम्हाला फोनवर मी सांगितले होते की आपण ज्या घरात राहात होतो त्या सर्व आठवणींचे एक पुस्तक मी प्रकाशित करणार आहे.

तुम्हाला खूप आनंद झाला होता.

बाबा, तुम्ही आम्हाला सोडून खूप दूरवर निघून गेला आहात परत कधीही न येण्यासाठी.

तुम्ही आमच्या आठवणीत कायम रहाणार आहात हे नक्की.

# अनुक्रमणिका

## क्रमाक्रमाने दिलेल्या रंगीत फोटोंची शीर्षके

१. पायरीवर बसलेली शेजारची मुले अमित, सिंपल, डिंपल व तिच्या मांडीवर बसलेली माझी भाची सई
२. अंगणात उभे राहिलेले आई बाबा, मी व सई – मागे दिसत आहे ते केळ्याचे व पपईचे झाड
३. अंगणात उभी राहिलेली माझी बहिण रंजना
४. घराच्या पत्र्यावर पसरलेला जाईचा वेल
५. दिवाणावर बसलेली सई व सिंपल
६. मंगळागौरीची पूजा
७. अंगणात बसलेले आई बाबा
८. बाहेरच्या खोलीत आई समवेत बसलेली शिकवणीची मुले
९. रंजनाचे डोहाळेजेवण – तिच्या शेजारी बसलेली मावस–आत्ये बहिण विनया
१०. अंगणात खुर्चीवर बसलेली सई
११. कपाटातला बांगड्या ठेवण्यासाठी असलेला लाकडी रॉड
१२. आमचा भाचा विनय, डिंपल, बाबा, टेबलावर असलेला रॅली कंपनीचा पंखा व टेलिव्हिस्टा टिव्ही, बाजुला असलेले १९७० साली घेतलेले कपाट
१३. दिवाणावर बसलेली माझी आई, मामे भाऊ सुहास दादा व नयना वहिनी – बाजूला सिंगरचे मशीन व आत स्वयंपाकघरात दिसत असलेले ताटाळे व डायनिंग टेबल

# १) माडीवाले कॉलनी

१९६१ साली पूर आला. पुरात जवळजवळ सगळेच वाहून गेल्यानंतर पुढे काय? हा प्रश्न होताच. सानेमाई यांचा बंगला माडीवाले कॉलनीमध्ये होता. त्या आईला म्हणाल्या 'तू अजिबात काळजी करू नकोस. माझ्याकडे एक खोली रिकामी आहे तिथे तुम्ही रहायला या.' पूर आला तेव्हा माझे बाबा विश्रामबाग वाड्यात कामावर गेले होते तर आई शिवणाच्या क्लासला गेली होती. माझी आजी (आईची आई) घरी पोळ्या करत होती. तिघेही तीन दिशेला होते. माझे आजोबा त्यावेळी वलसाडला होते काकाकडे. पूर येतोय ही बातमी कळताच बाबा कामावरून घरी आले तोपर्यंत ओंकारेश्वरा जवळील नदीचे पाणी वाड्याच्या आतपर्यंत पोहोचत होते. बाबा सांगतात की जवळजवळ कमरेइतक्या पाण्यातून वाट काढून आम्ही कसेबसे बाहेर पडलो. बाबांनी पटापट आईचे दागिने, थोडेफार घरी असलेले पैसे आणि जे काही सुचेल तसे पटापट पँटच्या खिशात कोंबले आणि आजीला म्हणाले, चला चला लवकर बाहेर पडा. केव्हाही पाण्याची पातळी वाढेल आणि वाडा बुडेल. आजी म्हणाली, एवढया पोळ्या करून घेते. तर बाबा म्हणाले, अहो पोळ्या कसल्या करताय, लवकर उठा आणि माझ्याबरोब बाहेर पडा. आगाशे वाड्यात आईबाबांचे बिऱ्हाड होते. श्री व सौ आगाशे यांना बातमी कळताच सामान पटापट कुठेतरी उंचावर, गच्चीवर जसे जमेल तसे ठेवत होते आणि तेही बाहेर पडत होते. श्री आगाशे यांचे वडील गच्चीत जाऊन बसले होते. ते म्हणाले मी इथून कुठेही हालणार नाही. माझे काय व्हायचे ते होईल. त्यांना समजावता समजावता नाकी नऊ आले.

आई शिवणाच्या क्लासमध्ये होती. तिलाही बातमी कळली आणि ती आणि तिच्या मैत्रिणी लक्ष्मीरोड कडे जायला निघाल्या. खरेतर बातमी रात्रीच कळाली होती की पानशेतचे धरण फुटले आहे आणि पाण्याचे लोटच्या लोट वहायला लागले आहेत. बाबा, श्री आगाशे आणि त्यांच्या शेजारचे

आदल्या रात्री गप्पा मारताना ‘काही नाही हो, अफवा असतील, दुसरे काही नाही‘ अशा भ्रमात! बाबा सांगतात, पूर रात्री आला असता तर आम्ही दोघेही या जगात नसतो आणि तुम्हा दोघी बहिणींना ही हे जग पाहता आले नसते. सगळेजण सदाशिव पेठेत राहणाऱ्या एका मामाच्या एका खोलीत जमले होते.त्या एका खोलीत १०-१५ माणसे ! आळीपाळीने काही आत आणि काही बाहेर असे करत होती. पूर येऊन गेल्यानंतर बरीच नासधूस झाली होती. माडीवाले कॉलनीतल्या सानेमाईच्या दुमजली बंगल्याच्यावर गच्ची होती. त्या गच्चीला लागून एक खोली होती. तिथेच माझा जन्म झाला. माझ्या बहीणीचा जन्म गोखलेनगरचा पण माई माझ्या आईला म्हणतात की अगं रंजना खऱ्या अर्थाने इथलीच! आईला रंजनाच्या वेळी दिवस गेले व गरोदरपणाच्या ७ व्या महिन्यात तिने व माझ्या बाबांनी श्री व सौ साने यांचा निरोप घेतला ते गोखलेनगरला येण्यासाठी. गोखलेनगर ही पूरग्रस्तांची कॉलनी आहे. तिथे माझ्या आजोबांनी पूरग्रस्तांच्या यादीमध्ये बाबांचे नाव लिहून जागेसाठी खटपट केली. वलसाडला असताना पुर आल्याची बातमी कळाल्यावर त्यांनी मन खूप घट्ट केले आणि मनाशी म्हणाले की पुण्यात गेल्यावर मला दोनापैकी एकच चित्र दिसेल ते म्हणजे की निळू आणि निर्मला जिवंत असतील किंवा नसतील!

आईबाबांचे लग्न १९५७ साली झाले. त्यानंतर त्यांचा संसार पुण्यातील आगाशेवाडयात सुरू झाला. आगाश्यांच्या वाड्यात लग्नाआधी बाबा, काका आणि मामा (म्हणजे माझे आजोबा) रहायचे. बाबा, काका आणि मामा १९५१ साली आगाशे वाड्यात राहायला आले. तिथे ते वाडयातल्या माडीवर राहायचे. आगाशे काका भुताच्या गोष्टी सांगत असत. १९५१ ते १९५७ सालापर्यंत बाबांनी इंग्रजी आणि गणित मुलांना फुकट शिकवले. जेव्हा बाबांचे लग्न झाले तेव्हा त्या घरात पहिल्यांदाच बाईमाणूस आले. बाबांची आई त्यांच्या लहानपणीच देवाघरी गेली आणि बाबांची बहिण वयाच्या १५ व्या वर्षी देवाघरी गेली. तिला टायफॉइड झाला होता

आणि नंतर तो उलटला आणि त्यातच ती गेली. जेव्हा आईचा बघण्याचा कार्यक्रम झाला तेव्हा मामा (आजोबा) म्हणाले की निळू हीच मुलगी तुझी बायको होईल. मामांना आईमध्ये त्यांची मुलगी दिसली. माझ्या आत्याचे टोपणनाव 'बेबी ' होते. आईचे लग्न झाले तेव्हा आई फक्त २० वर्षाची होती. आगाशे यांच्या आईला माझ्या आईचे खूप कौतुक होते. माडीवाले कॉलनी मध्ये सानेमाई यांचा दुमजली बंगला होता. या सानेमाई आईला ओळखत. ही ओळख म्हणजे अशी की आईची पनवेलची एक मैत्रीण मालूही लग्न होऊन माडीवाले कॉलनीत राहायला आली होती. आई पण लग्न होऊन पुण्याला आली आणि परत या दोघी मैत्रीणींची भेट झाली. मालूमावशी आई पेक्षा वयाने मोठी होती आणि तिला आईचे खूप कौतुक होते असे आई सांगते. सानेमाई आईला म्हणाल्या की बाबी तु काही काळजी करू नकोस. मी तुला आमच्या गच्चीला लागून जी खोली आहे ती देते. माईनी आईकरता आंबेमोहोर तांदुळही घेऊन ठेवले होते. आईचे लग्नातले दागिने बाबांनी माईच्या कडे ठेवायला दिले होते. माडीवाले कॉलनीमध्ये माईसाने यांच्या बंगल्यात वर गच्चीला लागून जी खोली होती ती बऱ्यापैकी मोठी होती. गच्चीमध्ये त्यांनी एक छोटी बाथरूम बांधून दिली.या घरात आईबाबा, मामा (आजोबा) आईची आई (आजी) असे राहत होते. मामा वलसाडहून जेव्हा आले तेव्हा त्यांनी बाबांना सांगितले की मी आता इथे च कायमचा तुझ्याकडे राहणार आहे. माईनी आईला एक मोठे पिंप पाणी भरून ठेवण्या करता दिले.शिवाय पिण्याचे पाणी दोघे मिळून वरच्या मजल्यावरून खाली एक हौद होता तिथून पाणी भरायचे. हौदाच्या शेजारीच पाण्याचा नळ होता. आईकडे जी बाई धुणेभांड्याला यायची ती याच नळावर धुणे भांडी करायची. त्याकाळी ती ५ रूपये घ्यायची या कामाचे! आईबाबा ज्या खोलीत राहायचे त्या खोलीचे भाडे होते रूपये १८ फक्त ! १९६१ ते १९६५ पर्यंत आईबाबा व आजोबा इथे राहिले.

आईबाबा पहाटे ४ ला उठायचे ते आधी पाणी भरायचे व नंतर

तळ्यातल्या गणपतीला जायचे. तिथून पर्वतीला जायचे. तिकडून आले की आई सर्वांचा चहा करायची व नंतर बाबा सायकलने विश्रामबाग वाड्यात कामाला जायचे. जेवायला घरी येऊन थोडी विश्रांती घेऊन परत कामावर जायचे. ज्या खोलीत हे सर्व जण राहत होते, तिथेच छोटे स्वयंपाकघर केले होते. स्वयंपाकघर म्हणजे मोठया खोलीत पडदा लावून एक आडोसा केला होता. आडोशाच्या आतली जागा म्हणजे स्वयंपाकघर ! आई व आजी स्वयंपाकघरात झोपायच्या आणि बाकीच्या खोलीत दोन पलंग होते त्यावर मामा व बाबा झोपायचे. अंघोळी गच्चीत बांधलेल्या बाथरूम मध्ये होत असत. उन्हाळ्यात आई आणि आजी गच्चीमध्ये भरपूर वाळवणे करायच्या. स्वयंपाक घरात दोन प्रकारचे स्टोव्ह होते, एक वाजणारा आणि दुसरा वातीचा,न वाजणारा. स्वयंपाकघरात लाकडाच्या दोन छोटया मांडण्या होत्या.

स्वयंपाक खाली बसूनच केला जाई. गच्चीचा उपयोग छान होत होता. सानेमाईच्या इथे रहात असतानाच आईने शिवणाचा डिप्लोमा केला व एसटीसी पण केले. आई सांगते आजी (आईची आई) होती म्हणून मला घरचे काही बघायला लागत नव्हते. आजी सर्व करायची. माझे आजोबा, आम्ही त्यांना मामा म्हणायचो. दुपारचे जेवण झाल्यावर ते ग्रंथालयात जाऊन वाचत बसायचे ते संध्याकाळी घरी यायचे.या खोलीतच आईबाबा शिकवण्या घेत. काही शिकवण्या घरी जाऊन घेत. प्रभात रोड व भांडारकर रोडवर दोन घरी आईबाबा मुलांना शिकवायला जात असत.

जेव्हा आईला दिवस गेले तेव्हा सानेमाईना खूप आनंद झाला. आईला त्यांनी वर्षभराचे लोणचे घालून दिले.माईनी आणि आजीने आईचे सर्व डोहाळे पुरवले. आई सांगते की तिला खूप कडक डोहाळे लागले होते. आईची सर्व प्रकारची डोहाळे जेवणे झाली. फक्त एक डोहाळेजेवण राहिले होते. मालूमावशी म्हणाली की गच्चीत चांदण्यातले डोहाळे जेवण करू. आईला सांगितले की तू फक्त तळण कर बाकी इतर स्वयंपाक आम्ही करू. मालूमावशी ( आईची मैत्रीण) तिचे यजमान व दोन मुली,

सानेकाका आणि माई, आजी आजोबा, आईबाबा असे सर्व चांदण्यातल्या डोहाळेजेवणाला हजर होते.

माझा जन्म इथलाच सानेमाईच्या बंगल्यातला. लक्ष्मीरोडवरच्या ताराबाई लिमये यांच्या दवाखान्यात माझा जन्म झाला. माईंनी माझ्या आईवर मुलीप्रमाणे प्रेम केले. मी आईला ६ वर्षांनी झाले. सानेमाईंना खूप आनंद झाला. त्यांनी माझे बारसे खूप थाटामाटात साजरे केले. जिलबी करायला आचारी बोलावला होता. स्वयंपाकाला बाई बोलावली होती. पण ती बाई यायच्या आत माईनीच बरासचा स्वयंपाक केला होता.

साने माई आईला म्हणाल्या की तुझ्या नातेवाईकांना बोलाव. शिवाय तुझ्या शिवणाच्या क्लासच्या मैत्रिणींनाही निमंत्रण दे. आई सांगते की माईचे आणि माझे मागच्या जन्मीचे नक्कीच काहीतरी ॠणानुबंध असणार, नाहीतर इतके कोणीही कोणासाठी करत नाही. माझे आजोबा मला दुपट्यात घेऊन गच्चीत सतरंजी टाकून खेळवत बसायचे. जेव्हा मी बसायला लागले तेव्हा आईकडे मुले शिकायला यायची त्यांच्यातच मी बसायचे. स्वयंपाक घराला जो पडदा होता तो मी माझ्याभोवती गुंडाळून घ्यायचे व पेन्सिली खायचे.आम्ही पूरग्रस्त म्हणून मामांनी एक फॉर्म आणून भरला होता. ती जागा केव्हा मिळेल या चौकशीसाठी त्यांनी अनेक फेऱ्या मारल्या. शेवटी गोखलेनगरला भाडयाची जागा मिळाली. आईने जेव्हा माडीवाले कॉलनी सोडली तेव्हा आई रंजनाच्या वेळेस (म्हणजेच माझ्या बहिणीच्या वेळेस) गरोदर होती. निघण्याच्या वेळी मालूमावशीने (आईच्या मैत्रिणीने) माझे आवरले. मी पावणे दोन वर्षाची होते. मालूमावशीने माझ्या छोट्या केसाची एक शेंडी बांधली. माझे तोंड धुतले. किंचित पावडर लावून ओल्या गंधाचा एक ठिपका कपाळावर लावला. मला फ्रॉक घातला. दूध प्यायला दिले.आम्ही जेव्हा गोखलेनगर ला राहयला गेलो तेव्हा तिथे अजिबात वस्ती नव्हती.गोखलेनगरला आम्ही स्थिरस्थावर झालो तेव्हा सानेमाई आईबाबांकडे येवून गेल्या आणि खूप रडल्या. आईला

म्हणाल्या इतकी काय घाई होती जाण्याची? इथे खूप विरळ वस्ती आहे. आमच्या इथेच राहिली असतीस तर काय बिघडले असते? गरोदर होतीस तर दुसरे बाळंतपण आमच्याघरीच करून जायचेस. तेव्हा माझे आजोबा म्हणाले अहो तुम्ही आम्हाला त्यावेळेला जागा दिलीत तेव्हा आम्हाला किती हायसे वाटले ते शब्दात सांगता येणार नाही. आम्ही पूरग्रस्त त्यामुळे लगेचच हालचाल करायला हवी होती. नंबर लावून खोल्या तयार होत्या आणि चाळीतल्या दोन खोल्या मिळाल्या त्या लगेच घ्यायला हव्या होत्या म्हणूनआम्ही तातडीने इथे आलो.

गोखलेनगरच्या जागेत जेव्हा आईबाबा रहायला आले तेव्हा आईला ७ वा महिना चालू होता. फेब्रुवारी महिन्यात माझी बहिण जन्माला आली. तिच्या जन्माच्या वेळेसच बाबांनी जाईचा वेल लावला. जाई आणि माझी बहीण एकाच वयाच्या!

------------*------------

# २) वास्तू

आई नेहमी म्हणते या वास्तुने आपल्याला तारले आहे. अगदी खरे आहे ते! नुसते तारले नाहीतर भरभरून दिले आहे. त्या जागेत राहिल्या आल्यानंतर २-४ महिन्यांनी माझ्या बहिणीचा जन्म झाला. मी दीड ते पावणे दोन वर्षाची होते. मी जेव्हा माँटेसरीत जायला लागले तेव्हा माझी बहीण पण हटून बसायची माझ्या बरोबर बालवर्गात यायला. मला अगदी अंधुक आठवत आहे की मी वर्गात सतरंजीवर सर्व मुलांच्यात बसले आहे आणि माझी पाटी मुळाक्षरांनी व पाढयांनी भरली आहे. आजोबा व आम्ही चौघे म्हणजे आईबाबा व आम्ही दोघी बहिणी खूप आनंदात राहिलो या घरामध्ये. मी जेव्हा पहिलीत गेले तेव्हा बाबा मला सायकलने शाळेत सोडायचे व आई मला न्यायला यायची. मला शाळेतून आणण्यासाठी आईला रोज डोंगर चढाउतरावा लागे. आमचे घर चहूबाजुंनी वेढलेल्या डोंगराच्या कुशीत होते.आई व मी आर्यभूषण बस थांब्यावर थांबायचो. त्या २ ते ३ तासाकरता आई रंजनाला आमच्या घराच्या शेजारी राहत असलेल्या आजीकडे सोडायची आणि म्हणायची की ही तुझी आजीची शाळा. आई तिला एका दप्तरात पाटी, पेन्सिल व खाऊचा डबा देत असे. मला शाळेतून आई घेऊन आली की रंजना पाटीवरच्या मारलेल्या रेघोटया दाखवायची व तिला चुक की बरोबरे हे पण देणे अपेक्षित असे. माझे पहिलीतले धडे तिला तोंडपाठ होते असे आई सांगते.

------------*------------

# ३) अंगण

ज्या वास्तुने आम्हाला भरभरून दिले त्याच्या वर्णनाची सुरवात मी अंगणापासून करते. सुरवातीला आमचे अंगण मातीचे होते. हे मातीचे अंगण दिवाळीत आई शेणाने सारवायची. आम्ही शेणात कधीच हात घातला नाही. आई म्हणायची आम्ही पनवेलला रहात असताना शेणाने बरेच सारवलेले आहे. ते सारवलेले आंगण नंतर छान दिसायचे. आम्ही दोघी व बाबा त्यावर रांगोळ्या काढायचो. आम्ही दोघी बहिणी ठिपक्यांच्या आणि बाबा निसर्गाच्या रांगोळ्या काढत असु. अंगणाला लागून थोडया थोडया उंचीवर तीन पायऱ्या होत्या आणि पायऱ्यांना लागून उंबरठाही होता. उंबरठयावर लक्ष्मीची पावले रांगोळीने रोजच्या रोज काढली जायची आणि तीन पायऱ्यांवर स्वस्तिके व पाने फुले काढायचो आम्ही दोघी बहिणी. त्यावर हळदीकुंकूही वाहायचो. अंगणात उन्हाळ्यात वाळवणे व्हायची.  भोंडला व्हायचा. त्यात दोन गोल असायचे. एक लहान मुलींचा आणि दुसरा आम्हां बहीणी आणि  आमच्या मैत्रिणींचा. सगळ्याजणी नटूनथटून यायच्या. एका पाटावर बाबा सुंदरसा हत्ती काढून द्यायचे. त्याच्या बाजूनी आम्ही फुले लावायचो. भोंडल्याची सर्व गाणी म्हणायचो आणि मग खिरापती ओळखण्याचा मोठा कार्यक्रम असायचा. त्यात आई ५ खिरापती करायची आणि एक खिरापत आम्हाला पण सांगायची नाही काय केली आहे ते ! उन्हाळ्यात वाळवणासाठी आधी सतरंजी घालून मग त्यावर भला मोठा जाड प्लॅस्टीकचा कागद, त्याला दाही दिशांनी मोठाले दगड लावायचो आणि बसायचो राखण करत. उन्हाळ्यात आमचे मामेभाऊ, मामेबहिणी असायच्या. प्लॅस्टीकचा कागद घालून ७ लाच आम्ही तयार असायचो राखण  करायला. डोक्यावर रूमाल बांधून एका हातात काठीही असायची. कारण अंगणात चिमण्यांचा वावर खूप असायचा. इतरही काही पक्षी यायचे.

साबुदाण्याच्या चिकवड्या, पापड, पापडया असे सर्व व्हायचे.

बाहेर ओल्या पापडया जेव्हा वाळत घालायचो तेव्हा आईला कमी आकडा सांगायचो. पापडया मोजल्या जायच्या. वाळत घालताना त्या तुटल्या म्हणून खातो असे सांगितले जाई. तेव्हा आई म्हणे खायला वेगळे घाणे करणार आहे मी पापडयांचे ! तेव्हा आम्ही भावंडे एकमेकांकडे पाहून अगदीच तुटली तर खातो ं ग, असे सांगायचो. या पापडया जेव्हा  सोलल्या जात असत त्या आम्ही सूप उलटे करून त्यावर घालायचो आणि मग एकेक सूप बाहेर यायचे. तेव्हा काही मंडळी आत पापडया सोलायला बसलेली असायची. पापडाचे डांगर कुटायला जड खलबत्ता होता. तांदूळ भिजत घालून ते आई जात्यावर दळायची. पाटावरवंटाही होता आमच्या घरी. रोजच्या रोज सडे तर इतके घालायचो ना अंगणात की समाधान व्हायचेच नाही! काही वेळा सडा न घालता नळीने अंगणात पाण्याचे फवारे मारायचो. नळीच्या टोकाला एक बोट अर्धवट लावून धरले की कारंज्यासारखे पाणी बाहेर यायचे आणि त्यातून सर्व अंगणाला पाणी फवारायचो. याच नळीने बागेलाही भरपूर पाणी घालून नंतर पाण्यात डुंबत बसायचो. वळवाच्या पावसात हमखास गारा पडायच्या. त्या पडायला लागल्या रे लागल्या की बाहेरच्या अंगणात येऊन गारा वेचायचो. गारा खाण्याकरता हातात धरायचो पण त्या निम्या अधिक हातावरच वितळून जायच्या ! मातीच्या अंगणात नंतर आम्ही फरश्या बसवून घेतल्या. त्यामुळे उन्हाळ्यात रात्री अंगणात ५ - ६ सतरंज्या घातल्या की आरामात गप्पा ठोकता यायच्या. आई बरेच वेळा अंगणात आराम खुर्ची टाकून बसायची. रात्री  पुण्यात थंडगार वारे वहायचे. आम्ही भावंड जमलो की मग अंगणातच बसून बाबा सगळ्यांना भुताच्या गोष्टी सांगत असत. भूताच्या गोष्टी रंगल्या की नेमकी कुणाला तरी तहान लागायची. कोण जाणार आहे आत पाणी आणायला? असे बाबांनी विचारले की कोणीच तयार नसायचे. रात्री ११ नंतर मात्र आत झोपायला उठायलाच लागायचे. गप्पांमध्ये आईबाबांचे मित्रमंडळ असायचे.

अंगणाला आधी फाटक होते ते लाकडाचे. नंतर लोखंडी बांधले. या दोन फाटकांच्या काही मजा आहेत. लाकडी फाटक होते. ते एका बाजूने बंद व एका बाजूने उघडे होते. जातायेता जो कोणी ते फाटक उघडून येईल तेव्हा ते लोटल्यावर तसेच सोडून द्यायचे तेव्हा ते दाणकन आपटायचे. लहान मुले तर सारखी येजा करायची आणि सारखे आपटले जायचे. आई ओरडायची म्हणून मग लहान मुले मुद्दामच सारखी येजा करायची. नंतर जेव्हा सर्व अंगणात फरशी घातली तेव्हा दार बदलले आणि लोखंडी केले. त्याला बाहेरून व आतून दोन कडया केल्या. बाहेरून आलेला सहज हाताने आतली कडी काढून दार उघडे आणि मग परत लावून घेत. या फाटकाची एक मजा म्हणजे वाऱ्याने याच्या कडया हालायच्या,तेव्हा आमची चांगलीच फसगत व्हायची. कारण दार वाजलेकी आम्हाला समजायचे कोणीतरी आलेले आहे आणि असेच वाऱ्याने जेव्हा वाजले जाई, तेव्हा येऊन बघावे तर कोणीच नाही. मग ठरवले दार वाजले की लगेच बघायला जायचे नाही कोणी येणारे असेल तेव्हा तो आत येईलच की!

गोधडी शिवणारी एक बाई होती. आईच्या जुन्या साडया, आजोबांची जुनी धोतरे साठली की आई त्या गोधडी शिवणाऱ्या बाईला बोलवायची. गोधडी शिवताना ती अंगणात शिवायची. मोठाल्या दाभणासारख्या दिसणाऱ्या सुया असायच्या. गोधडी शिवताना ती कशी शिवते, गोधडीचे डिझाईन कसे बनवते हे आम्ही दोघी बहिणी पायरीवर बसून बघायचो. मागच्या अंगणात तांब्याचा मोठा बंब पेटत असे. त्यातल्या गरमागरम पाण्याने आमच्या अंघोळी व्हायच्या. या अंगणात पितळेच्या सर्व भांडयांना व डब्यांना कल्हई लावली जायची. त्या दिवशी कल्हई लावलेली भांडी चांदीच्या भांडयांसारखी दिसत. त्या बाईला आम्ही सांगायचो अजून थोडी जास्त लावना कल्हई ! आईकडे एक बोहारीण यायची. अंगणात ती तिचे भले मोठे टोपले ठेवायची. त्यामध्ये बऱ्याच स्वयंपाकाच्या वापरातल्या गोष्टी असत. स्टीलचे थाळे, पातेल्या,

बरण्या, असे बरेच काही. आई तिच्याकडून नेहमी बाकीचे काही न घेता चिनिमातीचे सट घ्यायची. बाऊल व वेलबुट्टीचे डिझाईन असलेल्या कपबश्याही घ्यायची. शिवाय छोटेछोटे दगडी रगडे घेऊन पण एक बाई यायची. एक म्हातारी बाई येत असे. तिच्याकडून आई फण्या, कंगवे व सुया घ्यायची. या सर्व मजा अंगणातल्या होत्या. मे महिन्याच्या सुट्टीत अंगणात बसणे होत असे. पायऱ्यांवर बसून बाहेर जे विक्री करता येत असत त्यांच्याकडून बरेच काही घेतले जाई. हरबऱ्याच्या गड्डया, कुल्फी, बोरे, पेरू, दाणेफुटाणे. दुपारी अंगणात बसून याची मजा लुटायचो आम्ही सर्व भावंडे.

बाग होती आमच्या या घराच्या बाजूला. हिवाळ्यात कोयनेलच्या कुंपणाच्या व झाडाच्या अनेक काटक्या जमायच्या. जमलेला पालापाचोळा व वाळलेल्या काटक्यांनी शेकोटी पेटवायचो. थंडीमध्ये बरीच पाने गळून पडायची. आमच्या घरी एक मोठा खराटा होता त्याने सगळी पाने एकत्रित करून आमच्या अंगणात मस्तपैकी शेकोटी करायचो. पुण्यामध्ये त्यावेळेला भरपूर थंडी असायची. कुडकुडायला व्हायचे. दर रविवारी शेकोटीचा कार्यक्रम. सकाळी उठल्यावर आई सगळ्यांना आल्याचा गरमगरम चहा करून द्यायची. चहा घेऊन मग शेकोटीजवळच जाऊन बसायचो. शेकोटीची धग इतकी काही छान वाटायची ना! शेकोटी विझायला लागली की नुसताच धूर यायचा. मग आम्ही पुठ्ठ्याने वारा घालायचो. धूर निघून जायचा व परत शेकोटीची धग जाणवायला लागायची. तिथून अजिबात उठावेसे वाटायचे नाही. उन्हे वर आली की मग एकेकजण अंघोळीला उठायचा एक मोठा आळस देवून! हिवाळ्यात शेकोटी नंतर ठरलेला नाश्ता म्हणजे रव्याचा तव्यावर केलेला केक! या केकची चव अजूनही जिभेवर रेंगाळते. पुढच्या अंगणात आमच्या लग्नाच्या वेळी पाहुण्यांच्या जेवायच्या पंगती बसल्या आहेत. मंगळागौरी रंगलेल्या आहेत. ग्रहमखाचे होमहावन आणि गणेशयागही झालेला आहे. अंगणात पावसाचे पाणी साठल्यावर त्यात होडया सोडताना कोणी बनवलेली होडी बुडाली आणि कुणाची होडी तरली ते पहायला मजा यायची. मोठ्या

होडयांसोबत अगदी छोट्या होडयाही सोडायचो या पाण्यात. त्यातली एखादी होडी वहात जाऊन गवतात किंवा झुडुपात अडकायची. अंगणाला लागूनच असलेल्या पायऱ्यांवर आम्ही आत्येमामे बहिणी चिकटून बसायचो आणि गप्पा मारायचो. एक उठली की तिची जागा लगेच दुसरी पटकवायची ! पायऱ्याच्या शेजारी जाईचा वेल होता. त्यात आम्ही पूजा झाली की जे निर्माल्य तयार व्हायचे ते वहायचो.

------------*------------

# ४) न्हाणीघर, घराची साफसफाई आणि फरशी धुण्याचा कार्यक्रम

आमच्या घराची झाडलोट पण किती छान व्हायची. पूर्वी केरसुण्या होत्या. या केरसुण्यांनी केर काढताना खूप खाली वाकावे लागे कारण की त्या बुटक्या असायच्या. या केरसुण्या खूप गोड दिसायच्या. त्यांचा फुलोरा एखाद्या मोरपिसा सारखा असे. नंतर लांबलचक कुंचे आले. कुंच्याने केर काढायला मजा वाटायची. बाजारात गेलो की जास्तीत जास्त उंच कुंचे निवडायचो. खाली न वाकता केर काढायला छान वाटायचे. कुंचे आल्यावर केर काढण्यासाठी आमची भांडणे! दर दोन महिन्यांनी जळमटे काढून फरशी धुवायचो. फरशी धुणे हा एक मोठा कार्यक्रम असायचा. उंच काठीला केरसुणी सुतळीने बांधून भिंतीवरची उंचावरची जळमटे काढायचो व निरानिपटी सर्व काना कोपऱ्यातून केर काढले जायचे. सर्वात शेवटी फरशी धुण्याचा कार्यक्रम. याकरता आधी फरशीवर असलेले सामान कॉटांवर ठेवायचो. आई बादलीभर उकळत्या पाण्यात धुणे धुवायची पावड घालायची व त्याचा खूप फेस यायचा. बादलीच्या वर फेस येऊन नंतर तो बादली बाहेरही जायचा. आई हे उकळते पाणी तांब्याने फरशीवर टाकायची व खसाखसा फरशी धुतली जायची. सकाळी लवकर उठून ही कामे उरकायला लागायची. फरशी ब्रशने खसाखसा धुवून झाली की भरपूर बादल्या पाणी फरशीवर ओतायचो. हळुहळू करत सर्व फेस बाहेर ढकलायचो. दोन्ही खोल्यांना समोरासमोर दारे असल्याने पाणी भराभर अंगणात जायचे. खराटयानेही पाणी बाहेर काढायला मदत व्हायची. सर्वात शेवटी तरटे घेऊन फरशी पुसायचो. तरटाला लागलेले पाणी एका बादलीत पिळायचो. ते पाणी काळे झालेले असायचे. तरटाने बरीचशी फरशी पुसून घेतली तरीही फरशी थोडी ओली असायची. नंतर स्टुलावर रॅलीचा पंखा ठेवून तो सुरू करायचो. मग त्या वाऱ्याने उरलेली ओली फरशी वाळायची. फरशी धुतल्यावर एखाद्या मळकट मुलीला अंघोळ घातल्यावर ती कशी

स्वच्छ दिसते तशी फरशी स्वच्छ दिसायची! रॅली पंख्याची पाती लव्हेंडर रंगाची होती. पंखा सुरू केला की ही पाती गरागरा फिरून एक छान रंग निर्माण व्हायचा. हा लव्हेंडर रंग खूप छान दिसायचा. माझ्या मैत्रिणीकडे जो रॅलीचा पंखा होता त्याची पाती शेंदरी रंगाची होती. खूप सुंदर दिसायचे हे पंखे. या रॅली पंख्याला झाकण्याकरता आईने एक कव्हर शिवले होते. . भरपूर पाण्यात फरशी धुण्याची मजा काही औरच होती. एक वर्षाआड दिवाळीत या घराला रंगरंगोटी व्हायची. भिंतींना आकाशी रंग ठरलेला ! रंगारी रंग द्यायला घरी यायचे व रंग लावून जायचे. त्याचवेळेला आई त्यांच्याकडून पाट व पत्र्याचे डबे पण रंगवून घ्यायची. तेव्हा पण साफसफाई होत असे. ते रंगारी रंग लावायला यायच्या आधी आई नाश्त्या ला इडलीचटणी व दुपारच्या जेवणाला पोळीभाजी करून ठेवायची. रंगारी लोकांना पण आई चहा, नाश्ता व जेवण द्यायची. पाट आणि पत्र्यांच्या डब्यांना ऑईलपेंट असायचे. पत्र्यांच्या डब्यांना हिरवा रंग आणि पाटांना लालरंग असायचा. दारे, खिडक्या निळ्या आईलपेंटने रंगवायला सांगायचो. विटांच्या भिंतींना चुन्यात रंग टाकून तो लावला जाई. रंगांचा आधी एक हात मारून तो वाळला की दुसरा हात मारला जाई.

दर रविवारी आई आम्हा दोघी बहिणींना नहायला घालायची. त्या करता शिकेकाई उकळली जायची. कधीकधी रिठे. रिठे घालून जेव्हा केस धुतले जायचे तेव्हा केसनकेस सुटा व्हायचा. डोक्याचे एक भलेमोठे टोपले तयार व्हायचे. येताजाता आरश्यात आम्ही त्या टोपल्याला पहायचो ! अंघोळी करता पाणी आधी स्टोव्हवर तापायचे. त्या आधी बंब अंगणात होता. त्यात लाकडे जाळून बंब पेटवायचो व त्यातले पाणी अंघोळी करता घ्यायचो. गॅस आला व त्यानंतर सर्व काही गॅसवरच. नंतर बंबाला कॉईल लावून घेतली. त्यानंतर तर अंघोळ म्हणजे खूप आनंद होता. भरपूर पाणी घ्या. आंम्हीतर चांगल्याच डुंबायचो भरपूर पाणी घेऊन. त्यामुळे नहाणे तर खूपच छान होत होते. केस धुतल्यावर आई केस पंचाने गुंडाळून त्याचा मोठा अंबाडा घालून द्यायची. हा अंबाडा बराच वेळ राहू द्या म्हणजे केस कोरडे होतील असे आई

म्हणायची. बऱ्याच वेळानंतर पंचाने बांधलेला अंबाडा सोडला की केस पंचानेच खसाखसा घासायचो व नंतर पंचाने केस उलटे करून झटकायचो . त्या दिवशीनंतर आई आमच्या केसातल्या जटा काढून सैलसर एक वेणी घालत असे. पूर्वी दात घासायचो तेव्हा सुरवातीला दात घासायचे ब्रश कुठे होते, आम्ही राखुंडीने दात घासायचो. काळी दंतमंजन व चंचला अशा दोन राखुंडया होत्या. साबणही हिरवा हमाम असायचा. धुण्याचा साबण ५०१ बार मोठा चौकोनी जाडजूड होता. तो बरेच दिवस टिकायचा. भांडी घासली जायची ती ही राखेने. पितळ्याची सर्व भांडी चिंचेने घासली जायची. भांडी घासण्याकरता ही वेगळ्या घासण्या नव्हत्या. नारळाच्या शेंड्या आई जमा करून ठेवायची. बाथरूममध्ये जो नळ होता तो पितळी होता. नळाला पाणी यायचे तेही दिवसातून दोनदा यायचे. पहाटे ५ लायायचे ते सकाळी ८ वाजेपर्यंत असायचे व संध्याकाळी ५ ला यायचे ते रात्री ८ते९ वाजेपर्यंत असायचे. रात्री झोपताना आम्ही नळ उघडा करून त्याखाली बादली ठेवायचो. पहाटे पाचला नळातून फुर्रफुर्र आवाज करत धोधो पाणी यायचे. पाणी आले की पहिली आई उठून चहा ठेवायची व आम्हाला उठवायची. आम्हाला सर्वांनाच लवकर उठायला लागायचे. एकतर पाणी लवकर जायचे आणि शाळाही सकाळची असल्याने पटपट आवरून ६.४५ ची बस पकडायला लागायची. दुपारची शाळा असली तरीही लवकर आवरायला लागायचे कारण की सर्वांच्या अंघोळी वगैरे उरकून सर्व बादल्या, बंब व पत्र्याचा ड्रम भरून ठेवायला लागायचा. दुपारचे पाणी यायचे पण ते काही कारणाने आले नाहीच तर भरलेले सर्व पाणी सकाळपर्यंत पुरवायला लागायचे. नंतर काही वर्षांनी आईबाबांनी हौद बांधून घेतला. हौदाच्या बाजूला धुणे भांडी करण्याकरता फरश्या बसवल्या. हौदाला बरेच नळ बसवून घेतले होते. ही आयडीया आईची होती. नळाला पाणी आले की ते थेट हौदात पडायचे. हौद भरून झाला की नळ बंद करायचो. एक नळ हौदाच्या आतून, एक नळ हौदाच्या बाहेरून धुणे भांडी करण्याकरता वापरायला, व एक नळ बाथरूममध्ये. या हौदाच्या वर एक पत्र्याचे झाकणही

करून घेतले होते. आमच्याकडे दर रविवारी मधूमामा यायचा. हौद धुण्याचे काम त्याचेच असायचे. खूप हौशीने तो हे काम करायचा. येताना नेहमी काहीना काही घेऊन यायचा. ग्रीन बेकरीतले सामोसे, दूधाची पिशवी. संध्याकाळी जाताना काहीवेळेला तो दडपे पोहेपण करायचा. कधीकधी आमटीही करायचा. दिवाळीत पहाटे ४ ला यायचा आमच्या घरी. दिवाळीचा फराळ करून परत त्याच्या घरी जायचा. त्याचे लग्न काही कारणाने झाले नाही. एकटाच राहायचा.

आईकडे मोलकरीण असल्याने आम्हा दोघी बहिणींना धुणे भांडी करायला लागली नाहीत. कदमबाईना खूप कामे असल्याने त्यांची मुलगी जयश्री आमच्याकडे यायची. शनिवार रविवार ती भांडी कशी घासते ते आम्ही बघायचो व तिला सांगायचो आम्ही पण घासतोना दोन तीन भांडी. आमच्यावर ती ओरडायची व म्हणायची की नको तुमची आई मला ओरडेल. मग आम्ही तिला म्हणायचो नाही ओरडणार. आम्हाला दोनचार ताटल्या तरी देना घासायला. तशी द्यायची काही वेळेला. ती भांडी घासताना दोन बादल्या पाणी भरून घ्यायची. भांडी घासून झाली की ती घासून झालेली सर्व भांडी एका बादलीत टाकायची त्यामुळे ती बरीचशी बादलीतच स्वच्छ व्हायची व एकेक करून दुसऱ्या बादलीतल्या पाण्याने हाताने पाणी घालून ती सर्व भांडी विसळायची. ही पद्धत आम्हाला खूप आवडली होती.आई सर्व प्रकारचे शिवण घरीच शिवायची, त्यामुळे दारे खिडक्यांना पडदे घरी शिवलेले असायचे. दोन खोल्यांमध्ये भिंत होती व त्यात कडेचा थोडा भाग तसाच उघडा ठेवला होता. तिथेही एक पडदा होता. बाहेर वारे वाहत असले की खिडकीच्या पडद्यामध्ये बाहेरची हवा शिरायची व पडदा खिडकीच्या आत पूर्ण फुगायचा. वारे पडले की फुग्यामधली हवा काढल्यावर फुग्याची जशी स्थिती होते तशी त्या पडद्याची व्हायची. खिडकीच्या मध्ये असलेल्या लोखंडी गजाना हा पडदा चिकटत असे. हे सर्व पडदे स्प्रिंगच्या तारेतून घातले जायचे. ह्या तारेला दोन्हीकडून हूक होते. ते खिडकीच्या वर व खाली दोन्ही बाजूना खिळे ठोकून

अडकवले जायचे. दारावरच्या पडद्याला खालून झालर असायची. मुख्य दारावरचा पडदा व दोन खोल्यांमधून येण्याजाण्या करता जी जागा होती तिथला पडदा, हे दोन्ही पडदे आई थोडे आखूड शिवायची व दोन्ही पडद्यांना झालर असायची. स्वयंपाक घरात छोटी बाथरूम होती. तिलाही दार नव्हते. पडदाच होता. आमच्याकडे जेव्हा लोखंडी कपाट आले तेव्हा त्याला लावलेला पडदा नेहमी पारदर्शक असायचा. तो अशासाठी की येताजाता सहज आरशामध्ये बघता यावे. आमच्या या घरी तक्ये व उशा होत्या, त्यांना पण आई अभ्रे घरीच शिवायची. महिन्यातून एकदा हे सर्व पडदे, अभ्रे धुतले जायचे. उशांना व तक्यांना शुभ्र धुतलेले अभ्रे घालताना छान वाटायचे. अभ्रे धुतल्यावर ते आटायचे त्यामुळे उशीवर अभ्रे चढवताना ती त्यामध्ये कोंबून बसवावी लागे. त्या दिवशी सर्व उशा लठ्ठ दिसायच्या!

------------*------------

# ५) लाडका माळा

माहेरच्या घराचा सर्वात लाडका भाग म्हणजे माळा. आमच्या घरी कोणी लहान मुले आली की ती पहिली माळ्यावर जात. माळ्याच्या कठडयावरून खाली बघत. त्यांना खूप मजा वाटे. खाली उतरायलाच तयार नसायची. आम्हा दोघी बहिणींचा ही हा माळा अतिशय लाडका होता. स्वयंपाकघरातून या माळ्यावर जायला जिना होता. पूर्ण लाकडाचा भक्कम माळा सर्व बाजूने खूप उपयुक्त होता. एकतर माळ्यावर बरेच सामान राहिले होते. तिथे एक कॉटपण होती. स्वयंपाकघरात आजोबांनी केलेली लाकडी मांडणी होती. ती खुप जुनी झाली होती आणि बाकीच्या सोयी करून घेतल्याने जागा अपुरी पडत होती. मग त्या मांडणीचे दोन भाग केले आणि माळ्यावर ठेवले. त्यावर मोठमोठाले डबे, ज्यामध्ये आई व आम्ही मुलींनी मिळून केलेली सर्व वाळवणे ठेवायचो. शिवाय वर्षाचे सामानपण आई मोठमोठाल्या डब्यात भरून ठेवायची. याकरता ४ ते ५  मोठाले उंच असे गोलाकार डबे होते. त्यात गहू, ४ प्रकारच्या डाळी भरून ठेवायचो. हे सर्व  घाउक सामान आई गुलटेकडीवरून आणायची. आई घाऊक सामान आणते हे बघितल्यावर त्यात अजून ४-५ कुटुंबे सामील झाली. असे हे घाऊक सामान ४ ते ५ कुटुंबाचे आणले जाई व त्याकरता एक टेंपोपण ठरवलेला असे. सर्व वाळवणे पत्र्याच्या चौकोनी डब्यात भरले जायचे. वाळवणामध्ये पोह्याचे, उडदाचे व बटाटयाचे पापड असत. शिवाय तांदुळाच्या फेण्या, कुरडया, उकडून बटाटयाचा घातलेला कीस असे. मिरगुंड व भरलेल्या मिरच्याही असत.

आम्ही अभ्यासाला माळ्यावर बसायचो. जाताना बरोबर भाजलेले पापड, पापड्या व भाजलेले शेंगदाणे घेऊन जायचो. वाचनाचा किंवा लेखनाचा अभ्यास करता करता अधूनमधून खायचो. आमच्या घरी सतत शिकवण्या असल्याने एक खोली नेहमीच भरलेली असायची आणि आम्ही दोघी बहिणी

मोठया झालो, अभ्यासही वाढले, त्यामुळे माळा करून घेतला होता. रात्रीच्या जेवणाकरता आई हाक मारायची तेव्हा माळ्याच्या जिन्यावरून उतरून यायचो. पावसाळ्यात तर माळ्यावर बसायला खूप मजा यायची. अभ्यास करताना पाऊस पडला की पावसाचे एक वेगळे म्युझिक सुरू व्हायचे आणि त्याचवेळेला आईने गरमगरम पिठलेभात केलेला असायचा. किती छान वाटायचे हे सर्व त्यावेळेला ! बऱ्याच वेळेला आम्हा दोघी बहिणींना बटाटेवडे करण्याची हुक्की यायची आणि आम्ही आईला सांगायचो की आम्ही सारण करून देतो, तू आम्हाला बटाटेवडे तळून वाढ. मग ते बटाटेवडे खाण्यासाठी माळ्यावर जाताना जो लाकडी जिना होता त्या पायऱ्यांवर बसायचे. पण ते असे बसायचे की आई वडे तळताना दिसली पाहिजे म्हणजे डावी मांडी जिन्याच्या पायऱ्यांच्यामध्ये आणि उजवा पाय खालच्या पायरीवर सोडून बसायचा. एका पायरीवर स्टीलची ताटली की ज्यामध्ये गरमवडा आहे. आई वडे तळत आहे हे दिसण्यासाठी जिन्याच्या सर्वात उंच पायरीवर बसणे होत असे. डायनिंगटेबल वर एकजण, त्यातून कोणी एक मैत्रिण किंवा बहीण रहायला आली असेल तर ती पण असायची. पायरीवर जो बसायचा त्याचे स्थान उंच. मग डायनिंगवरचे माना वर करून त्याच्याकडे पाहून बोलत. जसे बटाटेवडे पायरीवर बसून खायचो त्याचप्रमाणे अंबोळ्याही खायचो. माळ्याच्या जिन्यावरची जागा पटकन मिळवायला लागायची. मला  तर ही जागा प्रचंड आवडायची.  मामेबहिणी व मावसबहिणी आल्या की आमच्या सर्व बहिणींची रवानगी माळ्यावर झोपण्यासाठी असायची. वर एक कॉट व गाद्याही होत्या. गाद्या घालून गप्पा मारतमारत झोपायचो. काही वेळेला आम्ही माळ्यावर असलेल्या बहिणी हळू आवाजात बोलायचो की आई खालून ओरडायची काय गं पुटपुटताय. मग हशा पिकायचा. काही वेळेला आम्ही बहिणी सिनेमाच्या स्टोऱ्या सांगायचो. थंडीत आणि पावसाळ्यात माळ्यावर झोपायला जाम मजा यायची. खाली उजाडलेले कळायचे ही नाही.

------------*------------

# ६) स्वयंपाकघराचे बदलते रुपडे

आम्ही लहान होतो तेव्हा गॅसची शेगडी व गॅस सिलेंडर फरशीवर ठेवलेला असायचा व आई खाली बसूनच चहा व सर्व स्वयंपाक करत असे. या घरी खूप पाट होते. ते लाल ऑईलपेंटने रंगवले जायचे. आईचा एक छोटा जाड पाट ठरलेला असायचा. पाने घेताना पाट, त्या पुढे ताट, ताटात वाटी व बाजूला फुलपात्रे व दोन जाड तांबे घेत असू. त्यात एक छोटा गडुवाला तांब्या होता. या गडुवाल्या तांब्यातून आजोबा पाणी प्यायचे. जसा छोटा पाट आईचा ठरलेला होता तसाच हा गडुवाला तांब्या आजोबांचा ठरलेला होता. जेव्हा आईकडे तिची सर्व भाचवंडे जमायची त्यावेळेला जेवायला सतरंज्या घातल्या जायच्या. त्या घालताना त्याची चौपदरी गुंडाळी करून घालत असु. कपडे वाळत घालायला उंचावर लाकडी दांडया होत्या. त्यावर कपडे वाळत घालायचो. त्याकरता दोनचार उंच काठया होत्या. त्यातल्याच एका काठीवर पाडव्याला गुढी उभारली जायची.

काही दिवसांनी हिंडालियमचा एक चौकोनी ओटा आला. त्याला लागूनच ताटाळे व खाली डबे ठेवायला कप्पे होते. त्यानंतर कडप्पाचा ओटा आला. मला जेव्हा नोकरी लागली तेव्हा पहिल्या कमाईचे मी सनमायकाचे डायनिग टेबल घेतले होते. त्यावर चहा प्यायला व जेवायला खूप छान वाटत होते. मोठया ताटांप्रमाणेच काही गोल स्टीलचे थाळेही होते. स्वयंपाकघरात दुभत्याचे कपाट होते.दुभत्याच्या कपाटाला जाळी होती. त्यात आई फक्त दूध, दही, तूप ठेवायची. तिथे दुसरे अन्न ठेवले की आई ओरडायची. आई दूध व दुधापासून तयार होणारे दही, ताक, लोणी व तूप हे खूपच निगुतिने करत असे. दुभत्याच्या जाळीच्या कप्याच्या खाली दोन खण होते. एकात बाकीचे उरलेले अन्न व खालच्या कप्यात मीठाची चीनी मातीची बरणी, तेलाची छोटी बरणी, मिसळणाचा डबा, असे सर्व होते.ओटयाच्या एका बाजूला पाणी प्यायचे स्टीलचे मोठे पिंप, व त्या शेजारी माठ होता. या

माठावर आम्ही जाईच्या कळ्यांचा केलेला गजरा एका रूमालात अलगद गुंडाळून ठेवायचो. सकाळी शाळेत जाताना गजरा उमललेला असायचा. लाकडी जिन्याच्या खाली पाटावरवंटा ठेवलेला होता. त्यावर सणासुदीचे पुरण वाटायची आई. आईने आम्हाला पाटयावरवंटयावर वाटायला शिकवले. एकादशीला आम्ही दोघी बहिणी, पाटयावर ओल्या नारळाची चटणी व दाण्याच्या आमटी करता दाणे गंधासारखे  वाटून द्यायचो. मीठमिरच्याही वाटायचो!

एक खूप मोठी लाकडी मांडणी होती. यात सर्व काही छान बसायचे. मोठे व छोटे डबे, मोठया व छोटया पातेल्या, तांबे,  भांडी,  एक कप्पा भाजी करता होता. खूप छान होती ही मांडणी. मांडणी व दुभत्याचे कपाट आजोबांनी एका सुताराकडून करवून घेतले होते.  त्याचे डिझाईन आजोबांनी सांगितले होते. स्वयंपाकघरात चहा प्यायला फरशीवर आम्ही पाट घेऊन त्यावर बसायचो. आई पहाटे उठून सगळ्यांचा चहा ठेवायची. त्यावेळी फरशीवरच गॅस होता. आई बसून चहा करायची. पांढऱ्या शुभ्र कपबशांमधून आई चहा ओतायची व आम्ही सगळे मिळून एकत्र चहा प्यायचो. आई थोडा जास्तीचा चहा करायची. पहिला चहा झाला की अजून कोणाला हवा असल्यास अजून द्यायची .बाहेरच्या खोलीत सतरंजीवर अभ्यास करताना जेवायच्या वेळेला मात्र खूप भूक लागलेली असायची.

सकाळी ८ ते १० अभ्यास करायचो. नंतर जेवायला बसायचो. पावसाळ्याच्या दिवसात पाऊस पडत असेल तर आणि अभ्यास झाला असेल तर बसल्या बसल्याच पावसाला बघायचो. थंडीत फरशी खूपच गार पडायची. मग दार लावून उरलेला अभ्यास करताना काही वेळा स्वेटर असला तरी गोधडी पांघरून घ्यायचो. जेवायला वेळ असेल तर त्यावेळात एखादा धडा वाचून व्हायचा. अधूनमधून आईचा स्वयंपाक  कुठवर आला आहे हे

पाहण्याकरता पाणी प्यायच्या निमित्ताने स्वयंपाक घरात डोकावायचो. आई म्हणायची वेळ आहे अजून. आईने हाक दिली रे दिली की लगेच स्वयंपाक घरात जाऊन पाने घ्यायचो. आधी पाट मांडायचो. त्यापुढे मोठाली ताटे असायची. आमटी करता वाटीही पानात ठेवायचो. दोन तांबे पाणी पिण्याकरता घेऊन वाढायच्या आधी आई म्हणायची. ''ताटे पुसलीत का?'' आईला ताटे स्वच्छ पुसलेली लागायची. मग आई गरमगरम आमटी व भाजीचे पातेले फरशीवर ठेवायची व एकीकडे पोळ्या करायला घ्यायची. बाबा सकाळीच कामाला गेलेले असल्याने आम्ही दोघी व आजोबाच जेवायला असायचो. आई गरम पोळ्या वाढताना आमच्या तिघांमध्ये एकावेळी एकाला अर्धी पोळी व दुसऱ्या दोघांना चतकोर चतकोर अशा पोळ्या वाढायची. गरम पोळीवर आम्ही तूप घ्यायचो. मधूनच गरम आमटी प्यायचो. डावीकडे चटणी नाहीतर लोणचेही असायचे. शिवाय रोज कोणती ना कोणती कोशिंबीरही असायचीच. पोळी संपली की गरम आमटीभात खाऊन त्यावर एक दोन वाटया ताजे ताक प्यायचो. डायनिंग टेबल मी नोकरी लागल्यावर पहिल्या पगारात घेतले. डायनिंगच्या वर ताटाळे होते. त्या ताटाळ्यातच कपबशाळे पण होते. जेवायला बसताना पाने घेणे सोपे झाले. जेवणानंतर डायनिंग टेबलाची मी खूप काळजी घ्यायचे. नीट वेळच्या वेळी पुसून घ्यायचे. कडप्याचा काळा कुळकुळीत ओटा त्यावर गॅस व आई आम्हाला गरम पोळ्या डायनिंग टेबलवर बसल्यावर जेवायला वाढायची. उष्टीखरकटी काढणे पण सोपे झाले होते. या आधी खाली बसायचो तेव्हा उष्टी काढल्या नंतर फरशी तरटाने पुसावी लागे.स्वयंपाकघरात लोणची, खारातल्या मिरच्या, सरबते, पन्हे मोठया प्रमाणात होत असत की जे आम्हाला वर्षभर पुरायचे.

------------*------------

# ७) डोळा भरूनी पाहे तुम्हा

बाहेरच्या खोलीची पहिली आठवण म्हणजे रेडिओवर पहाटे ६ पासून लागणारी भक्तीगीते. ही गाणी ऐकता ऐकता उठायलाच लागायचे. बाहेर पाउस पडत असेल तर वाटायचे की अंथरूणातून उठूच नये, असेच पडून रहावे गाणी ऐकत. हिवाळ्यात पहाटे पहाटे बाबा किंवा आजोबा रिकाम्या बाटल्या घेऊन सरकारी दूध आणायला बाहेर पडत. दार उघडले की गार वारे आत यायचे आणि आम्ही ओरडायचो बाबा दार लावून घ्याना पटकन. हिवाळ्यात किंवा पावसाळ्यात बाहेर अंधारलेले असायचे आणि आम्ही उठून आईच्या हातचा आलं घालून केलेला चहा घ्यायचो. सकाळी सातच्या बातम्या झाल्या की लगेच शाळेत जायला आम्ही बाहेर पडायचो. बाहेरच्या खोलीने सर्व काही पाहिले. जणू काही सर्व साक्षी. माझ्या आठवणीतला पहिला पलंग तीन रुंद जाड फळ्यांचा होता. काही अंतरावर दोन बाजूंना लोखंडी दोन स्टँड होते त्यावर या तीन मोठ्या रुंद आणि जड फळकुटया टाकायच्या की झाला पलंग! त्यावर गाद्या. या पलंगावर आजोबा झोपत असत. एक गादी, गादीवर पलंगपोस व पलंगाच्या खाली एक मोठी ट्रंक होती की ज्यामध्ये महत्वाचे सामान ठेवले जाई. ही मोठी ट्रंक खूप फेमस होती. नातेवाईकांकडे ज्यांचे कुणाचे लग्न असेल तेही ट्रंक घेऊन जायचे कार्यालयात. यात वधू/वर यांचे कपडे, दागिने, देण्याघेण्याचे काही अहेर असे सर्व मावत असे. ही ट्रंक आमच्या लग्नात तर उपयोगात आलीच. शिवाय अनेक नातेवाईकाकडे या ट्रंकेला खूप मागणी होती. ही ट्रंक माझ्या काकाच्या ही लग्नात होती ! अजूनही ही ट्रंक आईच्या घरी आहे. याट्रंकेला पूर्वापार चालत आलेला हिरवापेंट ही जश्याचा तसा आहे. ही एक ट्रंक आजोबांनी आईला तिच्या साड्या व वस्तू ठेवायला म्हणून घेतली होती.

आमच्या ४ गाद्या फरशीवरच एकावर एक गुंडाळून ठेवल्या जात व

त्यावर बेडशीटा पांघरल्या जात. हे सर्व भिंतीच्या एका कडेला लावत असू. त्याच्या बाजूला एक सतरंजीवर एकावर एक उशा ठेवून त्यावर पण एक बेडशीट घालत असू. त्यानंतर आमच्या घरी दोन सनमायका लावलेले दिवाण आले. हे दिवाणही दुकानात जाऊन विकत घेतले नव्हते. आईबाबा दोघेही शिकवण्या घेत असत. त्यातल्या काही शिकवण्या घरी जाऊन शिकवत. त्यात एक बाई होत्या त्यांच्या दोन मुलांना बाबा घरी जाऊन शिकवायचे. त्यांच्याकडे एक ६ फूट मोठा दिवाण होता व एक सिटी होती. तीही अशी सनमाईका लावलेली छान होती त्यांचा नातू ६ फुटापेक्षाही उंच होता त्यामुळे तो दिवाण त्यांना विकायचा होता. ती सिटी पण त्यांना काढून तिथे सोफा आणायचा होता. तर बाबांना त्यांनी विचारले तुम्ही विकत घ्याल का? मग बाबांनी विचार करून त्यांना सांगितले की आम्ही घेऊ हे दिवाण, पैसे किती द्यायचे. तर म्हणाल्या तुम्ही द्याल ते. ५०० रुपयामध्ये हे दोन्ही दिवाण आमच्या घरी आले तेव्हा आम्हाला काय आनंद झाला होता. हे दिवाण अजूनही आमच्याकडे आहेत. खूप सोयीचे असे हे दिवाण होते. त्यांना आतून ठेवण्याकरता जागाही होती. मग मोठा दिवाण आजोबांसाठी आणि छोटी सिटी म्हणजे दिवाणच तो ! तो आईकरता दुपारी तिला थोडया वेळासाठी पडायला. या दिवाणावर आम्ही काहीवेळा दुपारी तिघी मिळून झोपायचो. अर्थात तेव्हा तो आम्हाला तिघींनाही पुरत होता. दोन दिवाण आले तरीही आम्ही चौघे खालीच गाद्या घालून झोपायचो. एप्रिल मे महिन्याच्या सुट्टीत आम्ही सर्व आत्येमामे आणि मावस भावंडे एकत्र असायचो. आमच्या घरी सर्वांचाच अड्डा असायचा. कोणी कॅरम खेळतयं तर कुणी बुद्धीबळ तर कोणी पत्ते. यात एक वेगळा खेळ खेळायचो तो म्हणजे जगप्रवास. हा जगप्रवास आम्ही पुढच्या खोलीला ज्या पायऱ्या होत्या त्यावर बसून खेळायचो. त्या तीन पायऱ्या म्हणजे आमची जीप. सगळ्यात खालची पायरी म्हणजे पहिली सीट व त्यावरच्या दोन पायऱ्या म्हणजे मागच्या दोन सीटा! त्यात एक मामेभाऊ

जीप चालवायची ॲक्शन करायचा. वळण आले की ओरडायचा वळण आले बरं का! मग आम्ही सर्व वळण आले की कसे एका बाजूला कलले जातो त्याप्रमाणे ॲक्शन करायचो. वळण संपले की परत पहिल्या स्थितीमध्ये बसायचो. प्रवास करताकरता रात्र झाली की भाऊ म्हणायचा तुम्ही सर्वांनी झोपा आता. मी एकटा जीप चालवतो. या प्रवासामध्ये आम्ही खाण्याकरता कोको व बोर्नव्हीटा आईच्या नकळत घ्यायचो. आईला कळायचे नाही बोर्नव्हीटा आणि कोको इतका लवकर का संपता ेते! बुद्धीबळामध्ये सुद्धा खेळताना आधीच ठरवायचो मारामारी की सिरियस खेळायचे ते! मारामारी असली की डाव ५ मिनिटात संपायचा. एकाने एक प्यादे मारले की दुसऱ्याने लगेच उंट मारायचा. एकाने हत्ती मारला की एकाने घोडा उडवायचा. शेवटी फक्त राजा शिल्लक राहायचा. खटाखट मारामारी. खूप हासायचो. मागे शह असल्याशिवाय मारायचे नाही या नियमाने खेळलो सिरिअसली तरी धीर संपून शेवटी मारामारी ठरलेली ! कॅरममध्ये सुद्धा धमाल यायची. यात बाकीच्या खेळापेक्षा गेम हा खेळ जास्त चालायचा. एक हारला की त्यावर लगेच दुसरा बसायचा. काहीवेळा तर अगदी १ / १ या मार्कांप्रमाणे टफ गेम चालायची. नीट खेळता आले नाही तर म्हणायचो हात अजून तापला नाहीये. तो तापला की मग अगदी खूप अवघड सोंगटी पण कट मारून सहज छान जायची.

आई आमचे सर्व ड्रेस घरीच शिवायची. वेगवेगळ्या फॅशनचे फ्रॉक , स्कर्ट, शाळेचा गणवेश, पंजाबी सूट. त्यामध्ये वेगवेगळ्या प्रकारच्या बाह्या शिवायची. फुग्याच्या बाह्या, उडत्या बाह्या, मॅगी व स्लिवलेस आणि गळेपण गोल, चौकोनी, पंचकोनी, व्ही, बंदगळा असे बरेच प्रकार आईने छानछान शिवलेले आहेत. हे सर्व ड्रेस बेतून झाल्यावर जे कापड उरायचे ते सर्व आई गुंडाळ्या करून ठेवायची. त्याकरता एक मण्यांची बास्केट होती त्यात या सर्व गुंडाळ्या ठेवायची. त्यामुळे नातेवाईकात व मित्रपरिवारात कुणाकडे बारसे

असेल तर आमच्याकडून घरी शिवलेला बाळंतविडा असायचा. आईने अनेक प्रकारचे छानछान बाळंतविडे शिवलेले आहेत. पूर्वी फोटोचे एवढे अप्रुप नव्हते नाहीतर कितीतरी फोटो झाले असते बाळंतविडयाचे. नंतर बघताना किती छान वाटले असते ना! बाळंतविडयाचा फोटो व त्या खाली बाळाचे नाव लिहिले असते, त्याची जन्मतारीख लिहिली असती व त्याचाही एक फोटो बाजुला लावला असता. हा एक छंद म्हणून किती छान झाला असताना!

आईने घरी घालायचे मॅक्सीही खूप शिवलेले आहेत. मॅक्सी हा कपडयांचा आटोपशीर प्रकार होता. त्यात अम्ब्रेलाकट असायचे. फ्रॉकमध्ये चुण्याचुण्याचे व प्लेटीचे फ्रॉक असायचे, कधीकधी बॉक्सप्लेटीचेही! गळ्याला व खाली फ्रॉकला झालर असायची. आईचे ब्लाऊजही आई घरीच शिवायची व त्याला काजेही घरीच करायची. आम्ही दोघी बहिणी ब्लाऊजला व ड्रेसला बटणे आणि हुक लूप लावायचो. घरी सिंगर कंपनीचे मशीन होते. या मशीनला एक ड्रॉवरही होता. त्यात रिळे, सुया , टेप व कात्री ठेवलेली असायची. मशीनचे काम जेव्हा नसेल तेव्हा ते मशीनलाच असणाऱ्या लाकडी चौथऱ्यावर उपडे करून ठेवायचो. हे मशीन बाहेरच्या खोलीत होते आणि ते स्वयंपाकघरात येणाऱ्या दाराच्या बाजूला आडवे ठेवलेले होते. त्याखाली एक लाकडी स्टुलही असायचे. मशीनच्या वरती भिंतीवर एक काचेचा आरसा लावला होता. त्या काचेवरच फुलापानांची कोरलेली नक्षी होती आणि त्याला लागून काचेचीच आडवी पट्टी जोडली होती. त्यावर पाँड पावडरीचा मोठा डबा एका बाजूला. त्या शेजारी एक छोटा प्लॅस्टीकचा डबा. मोठ्या डब्यातील पावडर आम्ही त्या बाजूला असणाऱ्या प्लॅस्टीकच्या डबीत काढून ठेवायचो. हा डबा गोल आणि त्याचा रंग होता गुलाबी आणि झाकण होते लाल. त्यात एक निळा छोट्या आकाराचा स्पंज होता. त्याने पावडर लावायचो. जाईचे काजळ होते. अफगाण स्नो होता. ओले श्रृंगारचे लाल व काळे कुंकू होते. लाल आई करता

व काळे आमच्याकरता. शिवाय २ कंगवे व एक फणी होती. मोठा कंगवा आमच्या तिघींसाठी व एक लांब निमुळता कंगवा बाबांचा होता. मिसळीच्या आलेल्या उवा व लिखा काढण्यासाठी एक फणी होती. शाळेला वेणी घालून जायचे असेल तर त्याकरता काळ्या रिबिनी होत्या. रिबिन्या बांधून लांब पेडाच्या वेण्या आई घालायची. पेडाला शेवटी शेवटी रिबिनी बांधून थोडे उरलेले पेड घालून त्याला रिबिनीची एक गाठ बांधायचो आणि मग ती वर कानामागे पेंडांना घट्ट आवळून बांधायचो. या रिबीनीची वर एक गाठ बांधली की मग उरलेली रिबीन एखाद्या फुलाप्रमाणे आकार देवून बांधायचो. शाळेच्या व्यतिरिक्त बाहेर जाताना लाल, गुलाबी, पिवळ्या, पांढऱ्या व निळ्या रिबीनी होत्या. आई आमच्या वेण्या घालायची त्यातही बरेच प्रकार होते. दोनवेण्या, चारवेण्या, झोपाळे, बटवेणी, एकवेणी. गोंडयाप्रमाणे थोडे केस पेडीच्या खाली असेच सोडून द्यायचो त्या म्हणजे गोंडयाच्या वेण्या. आम्ही आमचे कानातळे, गळ्यातले, टिकल्या, क्लिपा, पिना, बांगडया हे सर्व लोखंडी कपाटात ठेवायचो. या लोखंडी कपाटाला दाराच्या आतून काही छोटे कप्पे होते. यात आम्ही हे सर्व ठेवायचो. त्यावेळेला वर्षातून एकदा नागपंचमीला हे सर्व घेत असू. तुळशीबागेत जाऊन खरेदी करायला आम्हा दोघी बहिणींना खूपच मौज वाटे !

डायनिंग टेबल आल्यावर पाटाचा उपयोग आमच्याकडे कुणी जास्तीचे पाहुणे आले की व्हायचा किंवा कुणाला केळवण व डोहाळेजेवण असले की मग आम्ही बाहेरच्या खोलीत पाने घ्यायचो. एकावेळी १०-१५ माणसे बसायची. केळवण असले की मग ताटाच्या खाली पण आम्ही पाट ठेवायचो. केळवण, डोहाळे जेवण असले की माझे बाबा प्रत्येक ताटाभोवती सुंदर महिरप काढायचे. जेवणे झाल्यावर मग उष्टी खरकटी काढताना आधी वेगळी रांगोळी एका जागी घेऊन मग ती केराच्या टोपलीत टाकून नंतर दोन वेळा तरटाने पुसून घेत असू. आमच्या घरी आई व बाबा दोघेही शिकवण्या

घ्यायचे. आई पहिली ते सातवी घ्यायची व बाबा आठवी ते दहावी पर्यंतच्या मुलांना शिकवत. त्यामुळे आमची बाहेरची खोली सतत भरलेलीच असायची. आई सकाळी सर्व आवरून ८ वाजता शिकवायला बसायची ते १० पर्यंत. नंतर परत दुपारी ३ ते ५ शिकवण्या असायच्या. बाबा संध्याकाळी ऑफीसमधून आले की त्यांच्या शिकवण्या ६ ते ९ चालायच्या. आधी ४-५ सतरंज्या अंथरायचो. नंतर मोठा जाड सुतडा घेतला होता. त्यानंतर कारपेट आले. दरवेळेला शिकवण्यांची मुले गेली की संतरंज्या झटकून टाकायला लागायच्या. सुतडा जास्त दिवस टिकला नाही. कारण की तो धुवायला खूप अवजड होता. कारपेट आले तेव्हा त्यावर केरही काढता यायचा. शिवाय कोणी जेवायला बसले तरी पाने त्यावरच घेतली जायची. शिवाय शिकवण्यांच्या मुलांना बसायलाही छान वाटायचे. कारपेट सुद्धा सारखे पुसून घ्यायला लागायचे. कारण की बाहेरच्या खोलीत सारखी वरदळ असायची. शिकवण्यांची मुले, आलागेला बराच होता. नातेवाईक व आईबाबांचे मित्रमंडळ शनिवार रविवार यायचे.

'आज आपण आपल्या घरी 'नटसम्राट' हे नाटक पाहणार आहोत' बाबा म्हणाले, बाबा सकाळी पूजा करत होते. त्या दिवशी रविवार होता. आम्ही दोघी बहिणी उशिराने उठून चहा पीत होतो. बाबांचे हे वाक्य ऐकल्यावर आम्ही दोघी म्हणालो ' म्हणजे काय बाबा ? ' बाबा म्हणाले माझे वाक्य परत एकदा नीट ऐका. आज संध्याकाळी टीव्हीवर नटसम्राट आहे ना? आम्ही म्हणालो 'हो' तर मग ते आपण आपल्या घरी पाहणार आहोत. आम्ही दोघी एकदम 'म्हणजे आपण टीव्ही घेणार आहोत का?' बाबांनी हसूनच मान डोलावली. आम्हा दोघींचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्या दिवशी संध्याकाळी आमच्या घरी टेलिव्हिस्टा टीव्ही आला. खूप छान होता. टेलिव्हीस्टाला सरकते दार होते. या टीव्हीवर घरी विणलेले कापड घालायचो. कृष्णधवल टीव्हीवर रविवारी संध्याकाळी नाटक सिनेमे असायचे. रविवारी संध्याकाळी आम्ही सर्वजण जय्यत तयारीने टीव्ही पहायला बसायचो. बाबा

म्हणायचे मी बाल्कनीत बसणार. बाल्कनी म्हणजे कॉट. कॉटवर आई बाबा बसायचे व आम्ही दोघी फोल्डिंगच्या खुर्च्यांवर बसायचो. या फोल्डिंगच्या खुर्च्या आरामदायी होत्या. नायलॉनच्या कापडांनी बांधलेल्या होत्या. त्याच्या पाठी खूप उंच होत्या त्यामुळे टेकून आरामात बसता यायचे. एक आरामखुर्ची होती. ज्यांना कोणाला सिनेमा बघण्यात स्वारस्य नसेल तो आरामखुर्चीवर आडवे पडून व डोळे मिटून सिनेमा ऐकायचा. रविवारी संध्याकाळी सर्व घर आवरून केर काढायचो. खिडक्यांचे पडदे लावून घ्यायचो. दार लावायचो व खुर्चीवर बसून दडपे पोहे खायला सुरवात केली की सिनेमाच्या टायटल्स सुरू व्हायच्या. साप्ताहिकी न चुकता बघायचो. साप्ताहिकीमध्ये पुढील आठवडयाच्या कार्यक्रमांची रूपरेषा सांगितली जायची. रविवारी जर फालतू सिनेमा दाखवणार असतील तर मग आम्ही घरी थांबायचो नाही. बाहेर कुठेतरी फिरायला जायचो. रविवार सकाळची रंगोली आरामात सकाळी उठताना गादीवर झोपूनच पहायचो. रंगोलीमध्ये गाणी छान लागायची. अंगावर पांघरूण व डोक्याखाली दोन दोन उश्या घेऊन रंगोली पहायचो. नंतर उठून चहा व बाकीचे आवरणे सुरू व्हायचे.

माझ्या माहेरी सर्व गोष्टी अचानकच आलेल्या आहेत. जसा टीव्ही अचानक घरी आला तसाच रेडिओ आमच्या घरी मी लहान असतानाच आलेला आहे. बाबांनी एकदा बाहेर चहा पिताना सुधीर फडके यांचे विसरगीत विसरप्रीत, विसरभेट आपुली हे गाणे ऐकले. हे गाणे बाबांना इतके काही आवडले की त्या दिवशीच बाबा रेडिओ विकत घेऊन आले. पूर्वी रेडिओ भलेमोठे असायचे. रेडिओच्या डाव्या बाजूला वर एक छोटा आयताकृती डोळा होता. तिथून हिरवा लाईट लागायचा व रेडिओ सुरू व्हायचा. स्टेशने बदलायला गोल चक्रासारखी बटणे असायची. ही बटणे फिरवली की आवाज लहान मोठा व्हायचा. एक बटण स्टेशन फिरवायला होते तर एक बटण बँड बदलायला होते. रेडिओच्या मध्यभागी एका आयताकृती चौकोनात काही अंतरावर

आकडे लिहिलेले होते. या आयताकृती चौकोनात एक लाल उभा बारीक दांडया सारखा एक काटा होता. स्टेशन बदलायचे बटण डावीकडे किंवा उजवीकडे फिरवले की हा लाल काटा डावीउजवीकडे सरकायचा व स्टेशने लागायची. मुंबई, पुणे, विविधभारती, ऑल इंडिया रेडिओ अशी सर्व स्टेशने लागायची. आईला मुंबई स्टेशन आवडायचे. त्यावर मराठी गाणी, श्रुतिका लागत असत. मुंबई अ, मुंबई ब, अशी काहीतरी स्टेशने होती. आम्हा दोघी बहिर्णींना विविधभारती खूपच आवडायचे. मला तर खूपच प्रिय होते. आईने मुंबई लावले असेल तर मी ते लगेच बदलून विविधभारती लावत असे. मग आमच्या दोघींची भांडणे व्हायची. दिवसभर रेडिओ सुरू असायचा.

आईलाही हिंदी गाणी आवडायची पण सारखी नाही. ती म्हणायची इतर स्टेशनांवरही चांगले कार्यक्रम असतात तेही ऐकले पाहिजेत. आईचे हे म्हणणे पटायचे पण हिंदी गाण्यांची इतकी आवड होती की सारखे विविध भारतीच लावले जायचे. रेडिओवर सुधीर फडके यांचे गाणे लागले असेल तर बाबा ओरडायचे 'हे गाणे संपले की तुम्हाला हवे तिथे जा' रेडिओवरचा लाल काटा सतत इकडे तिकडे हालत असायचा. शेवटी तो एकदाचा तुटला. इकडे तिकडे फिरून दमत असेल! सिलोन, ऑल इंडिया रेडिओ, मुंबई, पुणे अशी बरीच स्टेशने लागायची. रात्री सगळ्यात शेवटी बेलाके फूल लागायचे, ते ऐकूनच मग आमचा रेडिओ बंद व्हायचा. दुसऱ्या दिवशी परत सकाळी ६ वाजता भक्तीगीते व भावगीते या गाण्यांनी सुरू व्हायचा. सकाळची शाळा होती तेव्हाही भक्तीगीतेच आम्हाला जागी करायची. पाऊस पडत असेल, थंडीचे दिवस असतील तर असे वाटायचे की पांघरूणात तयार झालेल्या उबेतून बाहेर येऊच नये. गाणी ऐकत असेच पडून राहावेसे वाटायचे. एका दिवाळीतल्या भाऊबीजेच्या दिवशी बाबा असाच अचानक टेपरेकॉर्डर घेऊन आले. हा टेपरेकॉर्डर आयताकृती होता व त्याची बटणे आयताकृती चौकोनी

आकाराची होती. पियानो वाजवायची बटने कशी दिसतात तशीच होती. त्याला एक माईकही होता. माईकला वायर होती. हा माईक गॅस पेटवायचा लायटर कसा दिसतो तसाच दिसायचा. त्या दिवशी आम्ही सर्वजण खूप आनंदात होतो. पहिल्या प्रथम आजोबांनी काही श्लोक म्हणले. नंतर आम्ही सर्वांनीच आमच्या आवडीची गाणी म्हणली. गाणे टेप करायचे. नंतर रिव्हाईंड करायचे व ऐकायचे. आवाज कमी जास्त करायचे एक छोटे बटण होते. ते एका फटीत बसवले होते. ते मागेपुढे फिरवून आवाज कमीजास्ती करता यायचा. कॅसेटवर आम्ही काहीही टेप करायचो. बाळाचे जोरजोरात रडणे, कोणी झोपले असेल तर त्याचे घोरणे, शिंका कुणाला येत असतील तर त्या टेप करायचो. काही वेळा गप्पा मारताना त्या खुप रंगात आल्या की त्या टेप करून मग ऐकायचो. नंतर ऐकायला खूप मजा यायची. गप्पा मारताना आपण जसे काही वेळा खूप जोशात बोलतो ते नंतर ऐकताना मजा वाटायची. एकदा तर खडाजंगी भांडणे टेप केली होती.आमच्याकडे मामामामी, व आमची काही मामे व मावस भांवंडे जमलो होतो. गप्पा मारताना काही मुद्यांवरून वादावादी सुरू झाली आणि त्यातच मामामामीची भांडणे जुंपली. त्या दोघांचे तावातावाने बोलणारे आवाज आम्ही गुपचुप टेप केले. नंतर भांडणे निवळली. झोपण्याच्या आधी गादीवर बसून मामीला लाडात येऊन म्हणालो बघ ना मामी आमचा टेपरेकॉर्डर, कसा आहे? त्यावर मामी  म्हणाली ऐकवाना काहीतरी. मग लगेच टेप ऑन केला आणि भांडणाचा आवाज सुरू झाला. मामी डोळे विस्फारून हे काय गो! आम्हाला वाटले चिडली. पण नंतर तीच हासायला लागली, म्हणाली  डांबरट्ट आहात हो अगदी. नंतर मग काही दिवसांनी आम्ही भावंडे एकत्र जमलो की ती भांडणाची कॅसेट लावायचो व भरपूर  हासायचो.

उन्हाळ्यात बाहेरच्या खोलीत जसा आमच्या भावंडांचा अड्डा असायचा तसाच आईच्या मैत्रिणींचा पण असायचा. अर्थात पापड

लाटण्यासाठी! या मैत्रिणी एकमेकींकडे पापड लाटायला जायच्या. आमच्याकडे जो खलबत्ता होता तो खूपच जड होता. त्याला खूप मागणी असे आईच्या मैत्रिणींकडून. कारण की त्यात डांगर खूप छान कुटले जायचे. पोह्याच्या डांगराला तर खूपच घाव घालायला लागायचे. पाटा होता त्यावर आई डांगराच्या लाटया करून ठेवत असे. या खोलीने काय काय पाहिले आहे याला सुमारच नाही! चैत्रातले हळदीकुंकू, संक्रांतीचे हळदीकुंकू, रंजनाचे डोहाळे जेवण, सईचे बारसे, तसेच आमच्या दोघींचे साखरपुडे आणि बरेच काही. तीस तीन सवाष्णींचा जेवणाचा कार्यक्रम, मे महिन्यातले आमरसपुरीचे सर्व भावंडाचे जेवण, दिवाळीत दणक्यात साजरी होणारी भाऊबीज, सर्वकाही याबाहेरच्या खोलीत झाले आहे. हळदीकुंकुवाला तर १०० च्यावर बायका यायच्या ! सर्व नातेवाईक, आईच्या व आमच्या मैत्रिणीसुद्धा ! चैत्रातले हळदीकुंकू तर अगदी कायमचे स्मरणात राहील असे व्हायचे. सर्व बायकांना आधी हळदीकुंकू लावून, नंतर एकेक बत्तासा, काकडीचे गोल काप, आंबेडाळ, कैरीचे पन्हे असे सर्व देऊन झाले की मग आई सर्व बायकांची ओल्या हरबऱ्याची ओटी भरायची, गजरा द्यायची. त्यानंतर हाताला अत्तर लावून त्या बाईच्या डोक्यावर गुलाबपाणी शिपंडायचो. त्याकरता अत्तरदाणी आणि गुलाबदाणी होती. आईने आम्हाला खास हळदीकुंकवाच्या साडया घेतल्या होत्या आम्ही मोठया झाल्यावर ! त्यात एक साडी जरीवर्क केलेली लालचुटूक आणि एक साडी जरीकोट्याची पिवळी साडी. त्याला मरून रंगाचे काठ होते. नातेवाईकांकडे ठरलेल्या लग्नाचे केळवण तर खूप छान व्हायचे. कुटुंबातल्या प्रत्येक सदस्याला साग्रसंगीत जेवण असे. त्यात ताटापुढे बाबा सुंदर महिरप काढायचे. उदबत्या लावायचे. सर्वांना आग्रह करून आम्ही जेवायला वाढायचो. जेवायला वाढताना आम्ही स्वयंपाकघरातला एकेक पदार्थ आणून खाली वाकून वाढायचो. आईबाबा शिकवण्या घ्यायचे त्या मुलामुलींचे आई एक स्नेहसंमेलन भरवायची. त्यात विविधगुणदर्शनाचा कार्यक्रम असायचा. साधारण

दोघांची मिळून शिकवणीची मुले २० ते ३० जण असत. बॅचप्रमाणे मुलांना बोलवायचो. त्यांच्याकरता आई एक गोड व एक तिखट पदार्थ करायची. यामध्ये बटाटेवडे, गुलाबजाम, तिखटमिठाच्या पुऱ्या, श्रीखंड असे. शेजारची भालेरावआजी, आईच्या मैत्रिणी पंडित व सरपोतदारकाकू व जोशीकाकू यायच्या आईच्या मदतीला! बाहेरच्या खोलीत जे लाकडी कपाट होते त्याला खाली दोन कप्पे होते. एकेक कप्पा आमच्या वह्यापुस्तकांनी भरलेला असायचा. कपडयाचे लोखंडी कपाट चांगलेच दणकट होते. अजूनही ते आईच्या घरात आहे. या खोलीत आईने ५० बायकांना शिवण शिकविले. हा शिवणाचा क्लास  एप्रिल मे महिन्यात असायचा कारण की इतर शिकवण्या नसायच्या. आईने शिवणाचा डिप्लोमा केला आहे. त्यामुळे आई घरातले सर्व शिवण घरीच शिवायची. एप्रिल मे महिन्यात आम्ही दोघी मिळून आमटी भात करायला शिकलो.

------------*------------

# ८) एकोपा

पूर्वी चाळ-वाडा संस्कृतीत खूप एकोपा होता. शेजारी भालेराव कुटुंब रहायचे. आजीकडे लहानपणी माझी बहीण आजीच्या शाळेत जायची. आजीच्या घरातील लग्नकार्यात आमची जागा वापरली. तसेच आम्हां दोघी बहिणींच्या लग्नाच्या वेळेस आजीची जागा वापरली. आजीला बरे वाटत नसले की आई पोळीभाजी द्यायची. भालेरावांच्या शेजारी शहा कुटुंब आले. त्यांच्या दोन्ही मुलींचे नामकरण आम्ही दोघींनीच केले. एकीच्या गालावर खळ्या पडायच्या त्यामुळे तिचे नाव डिंपल ठेवले. तिला बहिण झाली म्हणून तिचे नाव सिंपल ठेवले. त्या दोघी आमच्या घरच्याच होऊन गेल्या ! महाजन मावशीच्या शाळेत माझी बहिण जायची बालवर्गात असताना. मावशीकडे उभ्याच्या गौरी असत. गणपती गौरींचा सण झाला की त्यांना घेतलेल्या माळा ती आम्हाला द्यायची. आम्हा दोघींच्या मैत्रिणी भाग्यश्री, सविता, शाळेत जाताना रिक्षेने जायचो. नंतर बसने जायला लागलो. दर दसऱ्याला आम्ही सर्व मैत्रिणी आणि त्यांच्या आया म्हणजेच आईच्या मैत्रिणी चतुर्श्रुंगीला देवीच्या दर्शनाला भल्या पहाटे उठून जायचो. संध्या ठाकूरचे स्वत:चे एक वर्कशॉप आमच्या घरासमोर होते. ती सुरवातीला आमच्या घरी पाणी प्यायला यायची. एक तांब्या पाणी भरून न्यायची. नंतर ती आमची कुटुंबमैत्रिण होऊन गेली. आईबाबा शिकवण्या घेत असल्याने बरेच विद्यार्थ्यांना त्यांनी शिकवले आहे. ते सर्व विद्यार्थी आमच्या घरी संक्रांतीचा तिळगूळ द्यायला घ्यायला आणि दसऱ्याला आपटयाची पाने द्यायला येत असत. अजूनही काही विद्यार्थी आईबाबांच्या दुसऱ्या घरी येतात आणि त्यांची आस्थेने विचारपूस करतात. या वास्तूत आईबाबा १९६६ ते २००३ पर्यंत रहात होते आणि २००३ साली सिंहगडरोडला स्थलांतरीत झाले.

------------*------------

# ९) जाईचा वेल व फळाफुलांनी बहरलेली बाग

जाई! जाई व जुईमधली एक! जुईला तसे मी खूप वेळा पाहिलेले नाही. क्वचित एकदोनदा पाहिले असेल आणि ती खूप नाजुक आहे इतकेच माझ्या लक्षात राहिले आहे. जाई मात्र डोळ्यात, मनात, आठवणीत अगदी तुडुंबपणे भरून राहिली आहे. जाईचा वेल माझ्या बाबांनी अंगणात मोठया उत्साहाने लावला असेल त्या वेळेला, म्हणजे चाळीस एक वर्षापूर्वी. माझ्या बहिणीचा जन्म व जाई अगदी बरोबरीच्या म्हणले तरी चालेल. जाईने आमच्या कुटुंबाला अगदी भरभरून दिले आहे. आम्ही दोघी बहिणी लहान होतो तेव्हापासून आठवत आहे आई आम्हाला जाईचे गजरे करून द्यायची. लहानपणी बॉबकट असल्याने आई आमच्या डोक्यावर हा जाईचा गजरा एखाद्या चक्राप्रमाणे बांधायची.

जाईचा विस्तार खूप मोठा होता. आमच्या घराचे छप्पर पत्र्याचे होते त्यामुळे अर्धा वेल पत्र्यावरच पसरलेला होता आणि अर्धा वेल अंगणातील मंडपावर होता. पावसाळ्यात जाईला खूप बहर यायचा, इतका की अंगणात पांढऱ्या शुभ्र फुलांचा सडा! शेजारच्या पाजारच्या बायका व मुली आमच्या अंगणात सडा वेचायला यायच्या. सर्व फुले वेचून झाली तरी काही वेळाने बघावे तर थोडीफार फुले पडलेलीच असायची. कधी जोराच्या वाऱ्याने पडायची तर कधी आपोआप गळून पडायची. सकाळी अभ्यास करताना एखादी नजर बाहेरच्या अंगणात गेली की अगदी त्याचवेळेला डोळ्यादेखत एखादे फूल पडलेले पाहिलेले आहे. आम्हा दोघी बहिणींना जाईच्या फांद्या हालवण्याचा नाद लागला होता, कारण फांद्या हालल्या की फुले पडायची आणि ती वेचायला खूपच मजा यायची. शाळा कॉलेजात जाताना रोज जाईच्या टपोऱ्या फुलांचा गजरा! लांबकेस असल्याने आई आमच्या दोघींची घट्ट पेडीच्या दोन वेण्या घालायची. एका वेणीवर खूप मोठा गजरा. त्याचे एक

टोक  वेणीच्या वरच्या पेडाला बांधायचे व एक टोक सर्वात खालच्या पेडाला. कधी उजव्या वेणीवर तर कधी डाव्या! त्या वेळेला डाव्या वेणीवर गजरा बांधायची फॅशन होती. काही वेळेला गजरा वेटोळा करून त्यात क्लिप अडकवून कानाच्या बाजूला ती क्लिप लावायचो तर कधी गजऱ्याचे दोन एकसारखे भाग करून मध्ये क्लिप लावून! शाळेला खूप उशीर होत असेल तर सेफ्टीपीने मध्ये फुले ओवायची  व ती  वेणीच्या पेडात  बांधायची. दुपारचे शाळा कॉलेज असेल तर सकाळचा अभ्यास झाल्यावर स्टुलावर चढून फुले काढायचो. जी फुले काढेल तिने दुसरीला विचारायचे की तू घालणार आहेस का गजरा म्हणजे तुझी पण फुले काढते. शाळाकॉलेजातून संध्याकाळी घरी येईपर्यंत गजऱ्यातील काही फुले सुकून ती चॉकलेटी रंगाची दिसू लागायची. शनिवारचे सकाळी शाळाकॉलेज असायचे तेव्हा मात्र शुक्रवारी संध्याकाळीच कळ्यांचा गजरा करून तो ओल्याफडक्यात गुंडाळून ठेवायचा, म्हणजे मग  सकाळी उठल्यावर उमललेल्या फुलांचा गजरा तयार! आम्ही जसे आमच्यासाठी गजरे करायचो त्यात अजून एक  गजरा  प्लॅस्टीकच्या पिशवीत घेऊन जायचो, कधी आमच्या मैत्रिणींकरता तर कधी शाळेतल्या बाईकरता.

रविवारी सुट्टीच्या दिवशी किंवा सणावारांच्या दिवशी जाईचे गजरे करण्याचा आम्हा दोघी बहिणींचा खूप मोठा कार्यक्रम असायचा. दुपारी जेवणे उरकली की आम्ही जाईच्या कळ्या काढायचो. टपोऱ्या गुलाबी रंगाच्या कळ्या मला अजूनही जशाच्यातश्या आठवत आहेत. आधी पत्र्यावर जाऊन कळ्या काढायचो. त्यात आमच्या मैत्रिणीपण असायच्या. आमच्याकडे काही ॲल्युमिनियमच्या व काही स्टीलच्या चाळण्या होत्या, काही टोपल्या पण होत्या. त्या मध्ये सर्व कळ्या व फुले काढायचो. खूप खूप कळ्या!! टोपल्यांमध्ये साठलेल्या भरगच्च गुलाबी रंगांच्या कळ्यांकडे बघत बसावेसे वाटायचे! कळ्या काढताना आई नेहमी ओरडायची, कळ्या काढा पण मुक्या कळ्यांना हात लावू नका. मुक्या कळ्या म्हणजे खूप बारीक कळ्या की ज्यांना उमलायला

अजून बराच काळ आहे.

पत्र्यावरच्या कळ्या काढून झाल्या की मंडपावर पसरलेल्या वेलीवरच्या काढायच्या. जाईच्या अवाढव्य व अगणित फांद्या सगळीकडे फोफावल्या होत्या. बऱ्याच फांद्या अंगणाकडे झुकल्या होत्या. सहज हाताने पण त्यावरील कळ्या काढता यायच्या. मंडपावरील वेलावरच्या कळ्या आम्ही स्टुलावर उभे राहून काढायचो. स्टुलावर उभे राहून सुद्धा आम्हाला आमची पावले उंच करायला लागायची, इतका उंच वेल होता! मातीचे अंगण खडबडीत असल्याने स्टुलावर उभे राहिले की ते डुगडुगायचे! स्टुलावर उभे राहून डुगडुगणारे स्टूल एका जागी स्थिर झाले की मग वेलाकडे बघून नजरेत येतील इतक्या कळ्या एका हाताने तोडून त्या मग चाळणीत टाकायच्या. एकीने कळ्या काढायच्या व त्याचवेळी दुसरीने चाळणी घेऊन स्टुलाच्या बाजूला उभे रहायचे, असे आलटूनपालटून.

त्यातही आमची भांडणे ' ए कायगं, किती काढतेस ग कळ्या ! मला काढू देतना थोडया तरी! 'अगं होना काढं की मग! ह्या बाजूच्या मी काढते तू दुसऱ्या बाजूच्या काढ.'मग स्टूल एका जागे वरून दुसरी कडे न्यायचो. आमच्या शेजारच्या काही छोटया मुली पण यायच्या, त्यांना पण स्टुलावर उभे राहून फुले काढायची इच्छा असायची. पण आम्ही त्यांना ओरडायचो, तुम्ही अजून लहान आहात ना, स्टुलावर उभे राहून पडलात म्हणजे! त्यापेक्षा तुम्ही खाली पडलेली फुले वेचा.सर्व कळ्या व फुले काढून झाल्यावर मग आई प्रत्येकाचे वाटे करायची. आमच्या मैत्रिणीपण खूप खुश व्हायच्या ! कळ्या फुले काढून झाल्यावर नंतरचा कार्यक्रम म्हणजे देवांच्या तसवीरींना हार, आजी आजोबांच्या फोटोला हार, व आम्हाला गजरे. हार व गजरे करता करताच कळ्या हळूहळू उमलायला लागायच्या. अर्धवट उमललेल्या कळ्यांचे हार व गजरे तर इतके काही सुंदर दिसायचे ना!! गणपतीच्या दिवसात आमच्या घरच्या गणपतीला जाईच्या फुलांचा भरगच्च हार असायचा, त्यात अधूनमधून जास्वंदीचे लालचुटूक फूलही असायचे.

आमच्या  घरामध्ये जाईच्या सुगंधाचा नुसता घमघमाट असायचा!! रात्रीच्या जेवणानंतर अंगणात गप्पा मारायला बसायचो तेव्हा जाईच्या वेलीवरती अगणित फुले, जणू काही पांढऱ्या शुभ्र चांदण्याच!

आमच्या बागेत विविध रंगांची व गंधांची फुले होती.  प्रत्येकाची शान वेगळी!  बागेला कुंपण होते ते कोयनेलचे. त्याला पांढऱ्या रंगाची थोडीशी लांब आणि नाजुक अशी फुले असायची. ती फुले तोडून त्याच्या टोकाला एक छोटे देठ असायचे हिरवे, ते काढून आम्ही त्यातला अगदी थोडासाच असलेला गोड  रस चाखायचो. त्या फुलाची दांडी होती ती एखाद्या बारीक नळकांडी सारखी. लहानपणी आपण काहीही करतो ना! कोयनेल अवाढव्य वाढले की आई म्हणायची 'एकदा रामूला निरोप द्यायला पाहिजे, येऊन आमचे कुंपण नीट करून दे म्हणून' हा रामू येऊन आमचे कुंपण साफ करून द्यायचा. येताना भली मोठी कात्री घेऊन यायचा कुंपण कापण्यासाठी. आम्ही दोघी मग सांगायचो त्याला 'कुंपणाला असा आकार द्या, तसा आकार द्या. ' कापलेल्या कुंपणाचा पसारा तो एका भल्या मोठया पिशवीत घालून घेऊन जायचा. त्या दिवशी आमच्या बागेची इतर साफसफाई पण व्हायची.

काही आपोआप उगवलेली झाडे दृष्टीस पडायची. मग हे कुठले बरे झाड असेल याची चर्चा व्हायची. माझ्या मावसबहिणीने काही रोपटी दिली होती. त्यात अबोली होती, मोगरा होता. गुलाबाचे तर बरेच रंग होते आमच्या बागेत, लालचुटुक, गुलाबी, शेंदरी. बाबांच्या काही मित्रांनी गुलाबाची रोपटी भेट म्हणून दिली होती. प्राथमिक शाळेत असताना बाबा मला सायकलवरून बालशिक्षणमंदीर मध्ये सोडायचे. सायकलवर बसताना माझ्या डाव्या हातात गुलाबाचे फूल, वर्गावर गेल्या गेल्या बाईंना देण्यासाठी ! ते फूल मी खूप अलगद धरायचे, त्याला जराही धक्का लागू नये ह्या कडे माझे लक्ष असायचे! कोऱ्हांटीची फिकट पिवळी नाजूक फुले व अबोली रंगाची अबोलीची नाजूक फुले अलगद हाताने काढावी लागायची. शेंदरी व अबोली रंगाकडे बघून असे वाटायचे की फुले अशीच झाडावर राहू दिली पाहिजेत. झाडावरून काढल्यावर

मोकळ्या झाडाकडे बघायला चांगले वाटायचे नाही. माझ्या बाबांची रोज सकाळी बागेमध्ये चक्कर असे. पूजेसाठी परडीत फुले काढत असत. त्यात जाईची तर असायचीच. शिवाय इतरही सुवासिक फुले, दुर्वा व उमललेले असेल तर जास्वंदीचे लालचुटूक तुरेवाले फूल! बदामी रंगाची जाळी असलेली प्लॅस्टीकची परडी होती. ज्या दिवशी जास्वंदीचे फूल असायचे तेव्हा आमच्या देव्हाऱ्यातले सगळे देव त्या फुलाने झाकून जायचे.

इतर फुलांमध्ये  सदाफुली होती, गुलबक्षी होती आणि कण्हेरी पण होती! सदाफुलीचा रंग व्हॉयलेट होता. फुलाच्या बाजुने व्हॉयलेट तर फुलाच्या मध्यावर गडद जांभळा रंग आणि मला अशाच रंगसंगतीच्या फुलाची सदाफुली आवडते! गुलबक्षीचा रंग इतर फुलांमध्ये खूपच उठून दिसायचा ! त्या गुलबक्षीचे विशेष महत्त्व गौरीगणपतीच्या दिवसात असायचे. या गुलबक्षीच्या वेण्या गौरींना असायच्या.  आई हाताने या वेण्या बनवायची त्यांची देठे एकमेकात गुंफून!

कण्हेरीची गुलाबी रंगाची फुले परडीत काढल्यावर खूपच सुंदर दिसायची. कण्हेरीची पाने लांबलचक असतात. त्याची पाने तोडून आम्ही ‘टिकटिक‘ वाजवायचो. कण्हेरीची दोन पाने म्हणजे लांबुळकी पाने समांतर रेषेत ठेवून त्याची टोके दोन्ही हातांच्या चिमटीमध्ये आणि मग ती एकमेकांच्याजवळ आणून परत लांब न्यायची. असे करताना ‘टिक, टिक, टिक, टिक‘ असा आवाज यायचा आणि मग असे करताना पाने तुटायची, मग परत दुसरी घ्यायची. चिनी गुलाब ज्याचा रंग साधारण गुलबक्षी सारखाच असतो तो आमच्या बागेत असाच उगवला होता. चिनी गुलाब सपाट जमिनीवरच वाढतो. सपाट जमिनीवर त्याचा वेल असतो. वेलाची पाने साधारण दुर्वांसारखी लांब असतात आणि त्या वेलातून अधुनमधून फुले असतात. अजून एक ‘हजारीमोगरा‘ नावाचा मोगरा होता. त्याची तीनचार बुटकी झाडे होती. त्याची फुले साध्या मोगऱ्यासारखीच दिसायची, पण पांढरी शुभ्र नाहीत.याची खासियत म्हणजे एका गुच्छात बरीच फुले असायची. त्या झाडांना अतोनात मुंगळे

यायचे. शेवटी मुंगळ्यांना कंटाळून झाडे मुळासकट कापली. का कोणजाणे पण हा हजारी मोगरा त्याच्या वेगळेपणामुळे माझ्या लक्षात राहिला आहे.

जाई समोर पेरूचे झाड होते. सुट्टीत आमच्या घरी सर्व भावंडे जमायची तेव्हा झाडावरचे पेरू तोडून खायचो. पेरूचे झाड काटकुळे व उंच होते. स्टुलावर चढून काठीने फांदी हलवावी लागायची मग पेरू खाली पडायचा. आम्ही भावंडे माना वेळावून बारीक नजरेने पाहायचो कुठे पिकलेला पेरू दिसत आहे का ते. पेरू पानाच्या आड लपलेले असायचे. आमच्या बागेत पेरू व्यतिरिक्त छोटी केळी होती, सीडलेस पपई होती, सीताफळे होती. घरची फळे खाताना किंवा घरची फुले माळताना जो काही आनंद होतो, जे काही समाधान मिळते त्याचे शब्दात वर्णन करता येत नाही. काही फळभाज्या पण होत्या. हिरवे टोमॅटो, छोटी वांगी, कारली बागेतल्या झाडांना आम्ही दोन प्रकारे पाणी घालायचो. एक भलीमोठी प्लॅस्टीकची नळी नळाला जोडायचो आणि नळीने बागेला पाणी घालायचो. आमची जाई  भरपूर पाणी प्यायची. नळाला पाणी आले नाही तर हौदातले पाणी बादलीत भरून घ्यायचो व तांब्याने घालायचो. बाबांनी आम्हाला सांगितले असायचे की जोपर्यंत झाड पाणी शोषून घेत आहे तोपर्यंत पाणी घालायचे. झाडांना भरपूर पाणी मिळाल पाहिजे.  बागेला पाणी घालण्याच्या निमित्ताने आम्ही पण पाण्यात डुंबून घ्यायचो!

गडदलाल रंगाचे जास्वंदीच्या फुलांचे झाड आमच्या बागेत असल्याने व अंगणात अगणित दूर्वा असल्याने गणपतीच्या दिवसात आमच्या घरच्या गणपतीला बागेतल्या फुलांचा हार असायचा. जाईची थोडी फुले, त्यानंतर हिरव्यागर्द दूर्वांची जुडी व त्यानंतर एक गडद लाल रंगाचे जास्वंदीचे फूल अशाक्रमाने भरगच्च हार गणपतीला खूप शोभून दिसायचा. आमच्याकडे गौरी खडयाच्या. बागेतून खडयाच्या गौरी आणायला आम्हा बहिणींना खूप मजा वाटायची. आई आम्हाला बागेतून गौरी आणायला सांगायची. पूजेचे सर्व

साहित्य घेऊन जायचो. त्यात गंध, अक्षता, कापसाचे हळदीकुंकू लावून बनवलेले वस्त्र, उदबत्ती, निरांजन अशी सगळी तयारी घेऊन खास गौरीगणपतीला शिवलेले फ्रॉक घालून जायचो बागेत. मातीचे अंगण असल्यामुळे त्यात बरेच खडे पण असायचे. मग त्यातल्या त्यात चांगले पाच खडे घेवून त्याची पूजा करून चांदीच्या कमळामध्ये त्या खडयांची गौरी म्हणून स्थापना व्हायची. सुवासिक फुलांबरोबर गुलबक्षीच्या फुलांची हाताने विणलेली वेणीही असायची. बागेतच मग हातातली घंटा वाजवून आरती म्हणायचो. नंतर तोंडात पाणी घेऊन गौरींना घरी घेऊन यायचो.आईने गौरींचे व आमचे औक्षण केले की मग तोंडातले पाणी बाहेर फेकून देवून रांगोळीने काढलेल्या पाऊलांवर चालत येवून गणपतीच्या शेजारी गौरी बसायच्या. गौरींना नैवेद्य म्हणजे घावनघाटले असायचे.

------------*------------

**आम्हा दोघी बहिणींना आजोबांचा प्रेमळ सहवास लाभला. आजोबांच्या वर मी व माझ्या बाबांनी लिहिलेले दोन लेख इथे देत आहे.**

## १०) तीर्थस्वरूप मामा

## लेखक - माझे बाबा - निळकंठ बाळकृष्ण घाटे



मामा! हो, आनंदमयमूर्ती, माझे वडिल. देखणे व्यक्तिमत्त्व, गौरवर्ण, सुवर्णकांती, विशाल भाल, हासरे निळेशार घारे डोळे. पाहिल्यावर कोणालाही आदरयुक्त आपुलकी वाटावी. लहान मुलांवर तर फार प्रेम. श्रीकृष्णाने घाबरलेल्या अर्जुनाला रथारूठ असताना रणांगणात गीता सांगितली, तशी या बालकृष्णाने संसारात राहून, गीता आत्मसात करून, पदोपदी मला ती अनुभवायला लावली. सर्वकाही कृष्णार्पण करावे, आपल्याकडे कोणत्याही कर्माचा कर्तेपणा घेऊ नये हे सांगितले. संसारात राहून, तीर्थातील बिल्वपत्राप्रमाणे त्यातील एक सुद्धा दवबिंदू त्यांनी आपल्या अंगास लागू दिला नाही. ‘ही सर्व तुझी इच्छा ‘ असे म्हणत ते वागले.

बालपणी वयाच्या चौथ्या वर्षी त्यांची आई कैलासवासी झाली आणि मामा पोरके म्हणून लोकांकडून उपेक्षाच झाली. कित्येकदा मामा देवळात जाऊन बसत. कधी नदीकाठी तर कधी कृष्णेकाठी वाळवंटात वेळ काढत.

स्मशानातील एकांताचा त्यांना खूप सहवास घडला. निर्सगात ते बरेच रमत. निसर्गातील परमेश्वर त्यांना पूर्ण दिसला होता. त्याने मात्र मामांची कधीच उपेक्षा केली नाही. निसर्गाने त्यांना आनंद दिला, प्रेम दिले व दुसऱ्यावर निर्व्याज प्रेम करायला शिकविले. प्रेम वाटत जावे, दिल्याने दुप्पट होते. त्यांना प्रेम करणे माहीत, परतफेडीची अपेक्षा त्यांनी कधीच केली नाही. उन्हाळ्यात सायंकाळी घाटावर बसावे, तर थंडीत उबेसाठी प्रेताजवळ शेकावे. कुणाकडे काहीही मागू नये, अगर त्रास देण्यांस कुणाकडे जाऊ नये, हे त्यांचे व्रत. याला अपवाद त्यांची ताई (माझी आत्या पोंक्षे) तिच्याकडे मात्र ते आई म्हणून जात. तिच्या सहवासातच त्यांनी बालपणातून तारुण्यात पदार्पण केले. अर्थात दारिद्र्य दुःख व अपमान याची त्यांना साथ होतीच. देवही त्यांना दुःखात टाकीत होता. कुंतीप्रमाणे त्यांनी ईश्वराकडे संकटे मागितली पण त्यातून सुटण्याचा मार्ग दाखव, तुझी आठवण असू देत असे सुचविले . सन १९५७ मे, २ तारखेस माझे लग्न झाले. ती.  आईचे निधनानंतर म्हणजे सन १९३६ नंतर पुन्हा आम्ही (मी, सौ निर्मला चि. मदन, व ती.मामा) आगाशेवाडा २१५/१ शनवारमध्ये संसार थाटला. कालपरवापर्यंत मामा आमच्यात वावरत होते. आता वार्धक्याने त्यांचे शरीर थकले होते. अवयव हळूहळू त्यांच्या आवाक्याच्या बाहेर जात होते. तरी मन आनंदी, सकाळपासून रात्रीपर्यंत सर्व दैनंदिन कार्यक्रम अतिउत्साहाने आमच्याकडून करून घेत. अजातशत्रू असल्याने कोणाशीही वैरभाव नाही. त्यांच्यावर सर्वांचेच प्रेम होते. ते चैतन्य आज दि. २०/७/१९८० रोजी पहाटे २.४५ वाजता पाहतापाहता अनंतात विलीन झाले. आकाशातून आमच्यावर प्रेमाचा वर्षाव करू लागले.मामांची सेवा माझ्यापेक्षा कितीतरी अधिक आणि मनापासून कुणी केली असेल तर ती सौ निर्मलाने केली. खरोखरीच मामांच्या आईची भूमिका तीने पूर्णपणे बजावली. अलीकडेच म्हणजे तरी पाच वर्षापासून मामांना स्वतःस आंघोळ करता येत नसे. हीने रोज त्यांच्या अंगास साबण लावून आंघोळ घालण्यापासून तो

त्यांना भात भरविण्यापर्यंत सर्वकाही आस्थेने केले. आम्हां सर्वांनाच त्यांची पदोपदी आठवण येत आहे. जाताना आमच्याकडे (मी, सौ निर्मला, चि. रोहिणी, चि. रंजना व चि.सुहास देवधर) पाहून मामांनी त्यांचे सर्व पुण्य आम्हाला वाटून दिले. चि. सुहास देवधरवर तर त्यांचे नातवाप्रमाणे प्रेम होते, आणि अगदी शेवटी तोच त्यांच्या जवळ होता. त्यांच्या आत्म्याला सद्गती मिळालीच आहे. आता ते नाशिकला पंचवटीत रामपदी स्थिरावले आहेत. आता विष्णुपुरीत त्यांचे वास्तव्य राहील. सौ निर्मलावर त्यांचा पूर्ण विश्वास. 'मामा! अजून एक पोळी घ्यायची आहे. नंतर तुमच्या म्हणण्याप्रमाणे एक भात (भातवाढीने एकदा वाढला की जेवढा होतो त्याला ते एक भात म्हणत.) वाढीन.' असे हीने म्हणले की त्यावर 'असं म्हणतेस? बरं मग वाढ एक पोळी,' असे म्हणत व भात घेत. सकाळी उठल्यावर तोंड धुवून ते एक फुलपात्र दुध घेत. पुढेपुढे त्यांना डोळ्याने दिसत नसे. त्यांनी रोहिणी, रंजनाकडून एका कागदावर देवाची नावे लिहून घेतली होती. तो कागद त्यांच्या खिशात असे. मामा सकाळी उठल्यावर रंजना रोहिणीस जवळ बोलवत व कागदावरील नावे वाचावयास सांगत, त्या त्या वेळी हात जोडून नमस्कार करीत. रंजना, रोहिणी बरोबर ९.४५ सकाळी जेवत व दुपारी ३ पर्यंत झोप घेत.

एका अरब कंपनीत नोकरी करण्याचे ठरवून ते मुंबईत दाखल झाले व बोटीने आफ्रीकेत गेले. एका डायरीत त्यांनी त्रोटक माहिती लिहून ठेवली होती. बोटीवर एका अरब पठाणांशी मामांची दोस्ती झाली. मामा पण त्या अरबासारखेच गोरे, लालबुंद व प्रकृतीने सणसणीत होते. रोज सायंकाळी मामा डेकवर जात. तो अरबही डेकवर येत असे.सूर्यास्ताच्या वेळी संपूर्ण आकाश लालबुंद असे. डेकवर खूप वारा असे. त्या रम्य वातावरणात त्यांच्या गप्पा रंगत. असाच एक दिवस तो मामांना म्हणाला, ' देखो बेटा, ये ध्यानमें रख. ये दुनियामे दिल किसीको देना नही, दिलसे देना दिल, अगर सच्चा दिल

नही मिला तो नही मिला, फिर कम दिलसे मत मिल, जो दिलवाला है, उसे दिल देना' हे जाणून मामांनी कुचक्या मनोवृत्तीच्या लोकांशी कायमचे संबंध तोडले होते.श्री शंकरावर मामांचे निस्सीम प्रेम आणि म्हणूनच त्यांच्या जीवनात मी आलो. नाव निळकंठ आणि स्वभाव तसाच. डोळ्यातून दोनच भावना  दिसणार. एक प्रेमाचा गहिवर नाहीतर अंगार. अश्रू वाहणार नाहीतर अग्नीकुंडातील ज्वाला व ठिणग्या. एक उत्तर ध्रुव माहीत नाही तर दक्षिणध्रुव. दोन ध्रुवांमध्ये सृष्टी परसलेली आहे, निसर्ग आहे, सौंदर्य आहे या कशाचीच पर्वा नाही. हिमालयातील कैलास शिखर माहिती, नाहीतर स्मशानातील चिताभस्म लावून जगाकडे तोंड फिरवून शून्यात दृष्टी  लावून बसणे माहिती. मामा स्वतः बाळकृष्ण- विष्णू आणि भक्ती शंकरावर आणि म्हणून मी कसाही  बोललो तर त्यांना राग येत नसे.

मामांची शंकरावर केव्हापासून भक्ती जडली ते त्यांनी कधी सांगितले नाही, पण लहानपणीच्या उपेक्षेमुळे त्यांना शंकर भक्ती, विरक्ती आवडली असावी. ते नेहमी कामावर असताना, आंघोळ केल्यावर मातीची साळुंका करून त्याची पुजा बेलाची पाने वाहून करीत व नंतर कॅनॉलचे पाण्यात त्याचे विसर्जन करीत. ते पि. डब्ल्यु. डी मध्ये इरीगेशनवर कामावर लागले. प्रथम प्रथम कॅनॉलवरील कॉजवेची दुरूस्ती, मैलाच्या दगडांची मांडणी व अशीच लहान कामे त्यांच्याकडे आली होती. एकूण सर्वच नोकरी निसर्गाच्या सान्निध्यात गेली. पुढे मामांनी एक चांदीची डबी करून त्यात शंकराची साळूंका   ठेवली. दुसऱ्या एका डबीत बेल असे. १२ वाजता दुपारी कामावर कॅनॉलमध्ये डुबी मारून, ओलेत्याने शंकराला बेल वाहून नमस्कार करीत.मामांची  निराराईट बँक कॅनॉलवर बदली झाली. निरेपासून  पूर्वेस अर्ध्या मैलावर पी. डब्ल्यु. डी चा पिंपरा बंगला होता. तेथील तारमास्तर दंडवते यांच्याशी मामांची मैत्री जमली. निरास्टेशन समोर पी. डब्ल्यू डी च्या क्वार्टर्स होत्या. त्याच्या जवळच एका  झोपडीवजा केमळाच्या  घरात आम्ही

राहत होतो.घर केमळाचे, कुडाच्या भींतीवर पत्रा. घरासमोर अंगण, स्वच्छ सारवलेल्या जमिनी. अंगणासमोर एक मोठे कडूनिंबाचे झाड होते.कडूनिंबावर सकाळी, सायंकाळी मोर येऊन बसायचे जमिनीवरून जाताना पिसाऱ्याचा झपाटा मागे लोंबत असे. आजुबाजूला खूपच झाडी होती. घरामागील टेकडीवरून काळ्या तोंडाची, लांब शेपटीची वांदरे नेहमीच झाडावर येत. पत्र्यावर उडया मारत. आमच्या हातातील हरबरा, कणसे न्यायला ती कमी करीत नसत. असाच एकदा मदन उघडा बाहेर अंगणात रांगत असता एका हुप्याने त्याचा रट्टा धरून त्याला अलगद पत्र्यावर नेले. मामा व आई दोघेही घाबरले. त्यांनी त्या वानरास शेंगाचे आमिश दाखवून मोठया युक्तीने मदनला खाली आणले.मला माझी आई आठवते. नऊवारी पातळ नेसायची. कपाळावर चंद्रकोर असे. कानात कुडया मोत्याच्या, बुगडी, ठुशी होती. मी पाच वर्षाचा असेन. हातात पाटी घेऊन, आईचा हात धरून मी कॅनॉलच्या पाटावरून पलीकडे असलेल्या पत्र्याच्या शाळेत जायचो. मी लहानपणी खूप रडायचो. आईला सोडत नसे.

आई गेल्याचा प्रसंग आठवतो. मला व मदनला उचलून शेजारी राहत असलेल्या काळे यांच्या घरात नेऊन ठेवले होते आणि आश्चर्य असे की आज काहीतरी निराळे झाले आहे, आणि आता रडायचे नाही हे मनोमनी समजले. त्यानंतर आई दिसलीच नाही. आठवणीत मात्र चांगलीच राहिली व तिनेच आम्हाला दुसरी आई दिली. ती माझी नथुमावशी. मी तिलाही आईच म्हणे. आठवू लागले तसा मी पुण्यात मावशीकडे आलो. शाळेत जाऊ लागलो. मामा सांगत असत की, 'आयुष्यात मी फक्त दोन वेळाच गहिवरलो. एक तुझी आई गेली तेव्हा व मग पुढे मुंबईस तुझी बहीण चि. नलिनी गेली तेव्हा.'' बाकी सर्व दुःखे मामांनी पचवलेली आहेत. त्यास मोठया धैर्याने तोंड दिले. आईच्या निधनानंतर मात्र मामांना पूर्ण वैराग्य आले.

निरेच्या डाकबंगल्यात तारमास्तर श्री दंडवते राहत. तिथेच मामा

आईच्या निधनानंतर राहिले. मास्तर स्वयंपाक करीत असत. मामा कॉफी घेत व मास्तर चहा घेत. दोघांची गाढ मैत्री होती. मास्तरांना दोन मुली. दोघींची लग्ने झाली होती. इंदुमती व सुमन. सुमन देशपांडे यांच्याकडे दिली होती. अर्धवट संसार टाकून मास्तरांची बायको देवाघरी गेली, पण मास्तरांनी दोनही मुलींचा चांगला संभाळ केला. दुसरे लग्न केले नाही. मामांची ही परिस्थिती तशीच होती. दोन समदुःखी मने जवळ आली होती.गोवईकर चाळीत मामा रात्री माळ्यावर झोपत. रात्री ते सतार वाजवत असत. जून महिना आठवतो. मृगाचा घनदाट पाऊस कोसळत असे. पत्र्यावर त्या पाण्याचा ताल वाजत राही. मामा सतारीत रंगलेले असत. गादीवर पडल्यापडल्या मी श्री गो. ग. लिमये यांचे 'प्रतापगडचेयुद्ध ' हे पुस्तक वाचत असे. वाचतावाचता केव्हा झोप लागे कळत नसे. सकाळी उठून पाहावे तो मामा केव्हाच उठून हडपसरला गेलेले असत. मामांना वाचनाचा नाद होता. पुणे नगरवाचनाचे ते वीस वर्षे मेंबर होते. पुरानंतर आम्ही १९५४ सदाशिव, साने बंगल्यात राहत होतो.पेन्शन घेतली होती. जेवणानंतर ते वाचनालयात जात व सायंकाळी ४.३० च्या सुमारास येत.

निरेला असताना आषाढीचे वारीस जाणाऱ्या वारकऱ्यांचा निरा लोणंद येथे दोन दिवस मुक्काम असे. त्यावेळी दोनचार वारकऱ्यांना मामा घरी घेऊन येत व जेवावयास घालीत. असेच एकदा, एका वारकऱ्याने आपल्या पोतडीतून एक सांबशंकराची साळुंका काढून मामांना दिली. पुजेत ठेऊन त्यांची पुजा करीत जा असे सांगितले. मामांनी त्याला एक चांदीची डबी केली व त्यावर फणा काढलेला चांदीचा नाग करवून घेतला. तो त्यांच्या पुजेत असे. पुढे आईच्या निधनानंतर मला व मन्याला सौ मनुमावशी सोलापुरला घेऊन गेली व चि. बेबीस सौ आक्कामावशीने इचलकरंजीला नेले. थोडे दिवसानंतर मी व मदन सौ मथुमावशीकडे पुण्यास आलो. ती. भास्करमामाने आम्हास पुण्यास आणले. पाच सहा वर्षाखाली मामा मला अधुनमधून म्हणायचे, ' हे बघ,

आता मला घरी राहवयाचे नाही. मला तू कुठं तरी पोहचव. त्यावर मी म्हणे, ' मामा तुम्हाला मदनकडे जायचे आहे का? त्यावर ते म्हणायचे, त्याच्याकडे मला बिलकुल जावयाचे नाही. त्याचे नाव सुद्धा काढू नकोस,अस म्हणत. मी म्हणे, ' मग मामा कुठं जावयाचे आहे तुम्हाला? ' हे पहा, मला एखाद्या देवळात नेऊन सोड. मी तेथे राहीन. माझा कुणालाच त्रास नको. त्यावर मामा, आजकाल तशी देवळे तरी कुठे राहिली आहेत? त्या वास्तुकडे कोणीही पाहत नाही. देवाची पुजा व्हायची अगर सांजवात लावायची मारामार. तुम्ही तिथे काय करणार? इथे नाही का बरे वाटत? असे मी म्हणायचो. परंतु त्या निष्पाप जीवाला आपले देवच रक्षण करील, तो माणसासारखा खास निष्ठूर नाही, असे वाटत असावे. या जगाचा व जगातील खोटया मायेचा त्यांना उबग आला होता.मन्या त्यांना दुरावला होता व माझ्याकडे घरामुळे झालेल्या त्रासाचा त्यांना मनोमनी वीट आला होता. पण मी तरी काय करणार? होऊ नये ती मोठी चूक माझ्या हातून झाली होती, व त्याचा परिणाम मात्र सौ निर्मला, रोहिणी, व रंजना यांच्या बरोबर मामांना नक्कीच होत होता. वय झाले होते म्हणण्यापेक्षा माझ्यावरील आलेल्या संकटाने मामांचे मन दडपले गेले होते. घरातील एकूण त्रासामुळे ते वैतागले होते. त्या सर्वांचे कारण मी होतो, फक्त मीच.एकदा अशीच रात्रीची वेळ होती. काही वादविवाद झाले असतील. मामा म्हणाले 'मी हा जातो घरातून निघून.' मीही त्यांना म्हणालो ' जाता? जा! दार उघडेच आहे ,पण नीट विचार करून जा. त्यावर ते धडपडत (कारण अलीकडे त्यांना कमी दिसत असे. चष्म्याने सुद्धा दिसत नसे. अंदाजाने ते घरात वावरत) पलंगाच्या कडेकडेने दाराजवळ गेले. एक पायरी उतरलेही. डाव्या हाताने जाईच्या वेलीची फांदी धरली होती. थोडे थांबले. लांब नजर टाकून उभे राहिले व परत मागे फिरले. मी म्हणालो ' मामा! जाताना? मग परत फिरलातसे? ' तेव्हा एक पाय खोलीत टाकून हळूच म्हणाले ' फार अंधार आहे बाहेर. उद्या सकाळीच जाईन. त्यावर मी

म्हणलं ‘अहो मामा, ज्याला जावयाचे आहे ना, त्याला रात्र काय अन दिवस काय’ त्यावर तेही हसले व आम्हीही हसलो.पण अखेर त्यांनी आपले शब्द खरे केले. पहाटे २.४५ वाजता अंधारातच त्यांची प्राणज्योत आम्हांस सोडून घराबाहेर गेली आणि जड शरीर मात्र, दुपारी स्वच्छ उन्हात आम्हाला एकाकी इथे टाकून गेलं या जगात न येण्याकरितां!

------------*------------

# ११) माझे आजोबा



माझ्या आजोबांचे नाव 'बाळकृष्ण' त्यांच्या वडिलांचे नाव दत्तात्रय, बाळकृष्ण दत्तात्रय घाटे. घाटे नावालाच, मूळ आडनाव काळे. माझ्या खापर पणजोबांनी एका घाटाचा जीर्णोद्धार केला त्यावरून आमचे आडनाव घाटे पडले.

माझे आजोबा उंच, धिप्पाड, घारेगोरे होते. माझ्या आजोबांना भरपूर भाचवंडे त्यामुळे ते सर्वांचे लाडके 'मामा' होते. सर्वजण मामा म्हणत त्यामुळे माझे बाबा, काका, आई व आम्ही दोघी बहिणी त्यांना 'मामा' म्हणायचो. माझी आई त्यांची थोरली सून. सून नावालाच मुलगी जास्त. सासऱ्यांनी सुनेवर मुलीप्रमाणे प्रेम केले. जेव्हा माझ्या बाबांसाठी आईचा मुलगी म्हणून दाखवण्याचा कार्यक्रम झाला तेव्हा मामा म्हणाले 'निळू हीच तुझी बायको. मला हिच्यात आपली बेबी दिसली. बेबी मामांची मुलगी. अल्पायुषी ठरली. मामांनीच सुनेचे नामकरण केले. 'निर्मला' घाटयांच्या घरात आली. रेवतीची निर्मला झाली. आईला जेव्हा माझ्या वेळेस दिवस गेले तेव्हा मामांना खूप आनंद झाला होता. दवाखान्यात मला ते रोज बघायला येत. मला दुपटयात गुंडाळलेली बघून त्यांना खूप आनंद झाला होता. मामा माझ्या आईला म्हणाले निर्मला हिचे नाव 'रोहिणी' ठेवायचे. दवाखान्यात मला बघायला येत असत

तेव्हा बाहेरून ते कॉफी मागवत त्यांना पिण्यासाठी, तेव्हा ते खूप छोटया चमच्याने मला कॉफी पाजायचे. मला दुपटयात असतानाच कॉफीची चव कळाली होती. जशी मी रांगायला लागले, चालायला लागले तेव्हा तर मी एक कपभर कॉफी पिऊ लागले. तेव्हापासून आईने मामांसाठी दोन कप कॉफी करायला सुरवात केली. मी पहिली मुलगी म्हणून माझे मामांनी खूप लाड केले. मामा मला गोष्टी सांगत. त्यांच्या पोटावर बसून मी गोष्टी ऐकत असे. त्यांच्या पोटावर एक उशी व त्यावर मी बसून गोष्टी ऐकत असे. काही दिवसांनी माझी बहिण आली. तिचे नाव आईने रंजना ठेवले. तिचेही मामांनी भरपूर लाड केले. आम्हाला दोघींनाही ते गोष्टी सांगू लागले.

काहीकाही गोष्टी अशा असत की आम्ही दोघीही म्हणायचो थांबा मामा 'लगेच त्या गोष्टी मधल्या हत्तीची नक्कल करायचो. जसे हत्ती चिखलात पडतो मग त्याला वर कसे काढायचे? थांबा मामा 'आमच्या दोघींची ॲक्शन सुरू व्हायची. हत्तीला दोऱ्या बांधलेल्या आहेत आणि त्या दोऱ्या आम्ही ओढतोय अशी ॲक्शन ' मग हत्ती डुलतडुलत त्याच्या घरी जातो. लगेच आमची ॲक्शन सुरू. आमचे उजवे हात म्हणजे हत्तीची सोंड! उजवा हात हलवून हत्ती डुलण्याची ॲक्शन! माझी आई जेव्हा मंडईत भाजी आणायला जायची तेव्हा मामा आम्हाला दोघींना दाण्याचे कूट व त्यात साखर घालून खायला द्यायचे. शाळेत जायला लागलो तेव्हा आम्ही दोघी व मामा पत्ते खेळायचो. पत्यांमध्ये हात कमी झाले की त्यांना खूप राग यायचा. सगळी चांगली पाने तुमच्याकडे कशी जातात असे म्हणून ते आमच्यावर रागवायचे. मामा आमच्याशी कॅरमही खेळायचे. आम्ही शाळेमध्ये असतानाच मामा खूप थकले होते. त्यांना जेवणासाठी स्वयंपाकघरात हात धरून न्यावे लागायचे. पाटावर बसल्यावर ताटात कुठे काय वाढले आहे हेही दाखवायला लागायचे. आम्ही तिघे सकाळी १० वाजता जेवायला बसायचो. आई आम्हाला तिघांना गरम पोळ्या वाढायची. शाळेत निघाल्यावर आम्हाला बजावून सांगायचे.

सावकाश जा. वेळेवर बस पकडा. रस्ता क्रॉस नीट करा. संध्याकाळी शाळा सुटल्यावर आम्ही बसने घरी यायचो. बसला खूप गर्दी असायची त्यामुळे शाळेतून घरी यायला आम्हाला उशीर होत असे. संध्याकाळ झाली की त्यांचे घडयाळ बघणे चालू व्हायचे. आईला विचारायचे कागं अजून आल्या नाहीत मुली घरी? दारात जाऊन वाट बघायचे. आई म्हणायची अहो मामा येतील इतक्यात. काळजी करू नका. बसला गर्दी असते खूप म्हणून उशीर होतो त्यांना. आम्ही जेव्हा घरी येत तेव्हा मामांच्या चेहऱ्यावर आनंद पसरायचा. बाबाही ऑफीसमधून घरी यायचे. मग आम्ही सर्व खायला बसायचो. सर्वांनाच खूप भूक लागलेली असायची. मग कधी पोहे, कधी तिखटामिठाचा शिरा तर कधी भाजणीचे थालिपीठे असे आई करायची. नंतर गरमगरम चहा प्यायचो. रात्री जेवायला गरम आमटीभात असायचा.

आई जेव्हा मंडईत जायची तेव्हा आधी आम्हाला मामा दाण्याचे कूट व त्यात साखर घालून द्यायचे. नंतरनंतर आम्ही आधी कुट खायचो व नंतर तेलतिखट मीठ पोहे खायला लागलो. एकदा मामांनी आम्हाला विचारले काय गं खाता दोघीजणी. आम्ही म्हणायचो की आम्ही तेलतिखट मीठ पोहे खात आहोत तुम्हाला पाहिजे आहेत का? त्यांना थोडे पोहे खायला दिलेतर त्यांना ते खूपच आवडले! तिखट पदार्थ त्यांना खूप आवडत असत. नंतर मग जेव्हा आई बाहेर जात असे तेव्हा तेच आम्हाला तेलतिखटमीठ पोह्यांची आठवण करून द्यायला लागले. आई बाहेर गेली आणि थोडावेळ गेला की लगेच म्हणायचे ते ते काय.तुम्ही करता ते केले का? आम्हाला माहीत असायचे त्यांना काय हवे आहे ते. मग आम्ही उगीचच म्हणायचो, कि उप्पीठ का? भजी का? मग म्हणायचे नाही गं ते तुम्ही काय करता ते कांदा घालून. त्यांना पटकन आठवायचे नाही. मग आम्ही म्हणायचो पोहे का? हां हां तेच तेच. करा लवकर खायला. जरा जास्त तिखट घाला. एकदम त्यांच्या चेहऱ्यावर आनंद. आम्ही तिघेही मोठया वाडग्यातून पोहे खायचो. कच्चे पोहे, तिखटमीठ, कच्चा कांदा व कच्चे दाणे असे एकत्र करून पोहे करायचो.

एकदा आमच्या दोघींची खूप भांडणे झाली कामावरून. जेवण झाल्यावर उष्टी खरकटी भांडी कोणी गोळा करायची त्यावरून. आई बाबा दोघेही चिडले. कामांच्या वाटण्या कशाला करता तुम्ही? आणि त्यावरून भांडता कसल्या? बाबा तर खूप चिडले आणि म्हणाले की कामाच्या वाटण्या आणि त्यावरून जर भांडणे करणार असाल तर या घरात राहायचे नाही. बाहेर निघून जा, म्हणून आम्हाला घराबाहेरील अंगणात उन्हात उभे केले. आम्ही दोघी खूप रडत होतो, तेव्हा मामा सारखे पायरीवर उभे राहायचे, परत आत जायचे. असे सारखे त्यांचे चालू होते. शेवटी ते म्हणाले 'निळू घरी घे आता त्यांना. बाहेर खूप उन आहे' तेव्हा बाबा म्हणाले की तुम्ही म्हणता म्हणून नाहीतर दोघींनीही कबूल केले पाहिजे आम्ही यापुढे कधीही भांडणार नाही. तेव्हा मग आम्ही दोघीनी बाबांची माफी मागितली आणि सांगितले की आम्ही कधीही कामाच्या वाटण्या करणार नाही व भांडणार नाही. तेव्हा मग बाबांनी आम्हाला घरात घेतले. माझ्या बाबांना ते निळू म्हणून हाक मारत. निळकंठ नाव म्हणून निळू.हळूहळू मामा बरेच थकत चालले होते. जेवण कमी झाले होते. दृष्टी कमी झाली होती. एकदा असेच झाले आई जेव्हा मला ओरडली तेव्हा माझी बाजू घेऊन मामा तिला म्हणाले अगं ओरडू नको तिला. नाही असे करणार ती पुन्हा. रंजनाची म्हणजे माझ्या बहिणीची बाजू त्यांनी कधी घेतली नाही जेव्हा आई रंजनाला ओरडायची तेव्हा. एकदा रंजना जाम चिडली. मामांना म्हणाली की तुमचे ताईवरच जास्त प्रेम आहे, माझ्यावर नाही. आई माझ्यावर ओरडली की तुम्ही कधीही माझी बाजू घेत नाही. तेव्हा तिला म्हणाले अंग असे नाही रंजे, तुम्ही दोघीही मला सारख्याच आहात. तेव्हापासून त्यांना काहीही लागले तरी रंजे म्हणून हाक मारत असत ते अगदी शेवटपर्यंत! रंजनाचे म्हणणे त्यांना अगदी मनोमन पटले होते.

एकदा आईला म्हणाले की मला तुझ्याशी बोलायचे आहे, तर आई म्हणाली बोलाना मामा. काय पाहिजे तुम्हाला. तर म्हणाले 'अगं निर्मला

मला असे वाटते आहे की मी लवकर मरेन, जास्त दिवस नाही जगणार मी आता. त्यांच्या हातातली अंगठी आईला दिली आणि आईला म्हणाले की ही अंगठी दोघींना अर्धी अर्धी करून दे' तशी आई म्हणाली की मामा, असे काय म्हणता तुम्ही. तुम्हाला काहीही झाले नाहीये. तुम्ही अजून बरेच दिवस जगणार आहात. इतक्यात मरून कसे चालेल? नातजावई बघायचा आहे ना तुम्हाला अजून! मग! मामा हसले आणि म्हणाले होहो. तर! अगं मी काही इतक्यात मरत नाही. आपल्याला अजून नातजावई बघायचा आहे या जाणिवेने त्यांना एकदम आनंद झाला आणि हुरूपही आला. त्यांना तिखट पदार्थ खूप आवडायचे. भजी व चिवडा हे अत्यंत आवडीचे पदार्थ होते. पाऊस पडायला लागला की आईला भजी तळायला सांगायचे. मामांना भरपूर भाचवंडे होती. भाचवंडांवर त्यांनी मनापासून प्रेम केले. आजी लवकर गेली. त्यामुळे ते भाचवंडांमध्ये खूप रमायचे. सर्वांना ते डोंगरावर फिरायला नेत असत. डोंगरावर फिरून आल्यावर सगळ्यांना भेळ व आईस्क्रीम खायला घालायचे. त्यात माझे बाबा व काकाही असत. मामांच्या सारखीच आईलाही भरपूर भाचवंडे त्यामुळे त्यांच्या सर्वांचीच ते आवर्जून चौकशी करायचे. कुणाचे लग्न ठरले की त्याला म्हणत की 'मी तुझ्या लग्नाला येणार आहे बरं का?' खूप हौशी आणि प्रेमळ होते मामा! आईबाबांच्या संसारात येणाऱ्या प्रत्येक संकटात मामा त्यांच्या पाठीशी ठामपणे उभे होते.

आम्ही कॉलेजमध्ये जायच्या आधीच मामा खूपच थकले होते आणि काही दिवसांनी तर त्यांनी पूर्णपणे अंथरूण धरले होते. जेवण कमी झाले. माझ्या आईने त्यांची मनापासून न कंटाळता सेवा केली. डॉक्टर रोज घरी त्यांना बघायला यायचे. हळुहळू त्यांनी अन्न सोडले. त्यांना फक्त दूध, पाणी, फळांचे रस एवढेच जात होते. नंतर तेही कमी कमी होत गेले. एखादा पाण्याचा घोट, १-२ चमचे कॉफी, तर काही वेळेला अगदी थोडा फळांचा रस, इतकाच आहार झाला. एके दिवशी ते खूप घोरत होते. आईला त्यांचे घोरणे

विचित्र वाटले. लगेच तिने डॉक्टरांना घरी बोलावले. डॉक्टरांनी सांगितले की हे घोरणे नाही, तर शेवटची घरघर आहे. आता ते कधी जातील काही सांगता येत नाही. आम्हाला मामा जाणार या कल्पनेनेच कसेसे होत होते. मामा आपल्यात नाहीत ही कल्पनाही सहन होत नव्हती. शेवटची घरघर लागण्या आधी ते काहीवेळेस अर्धवट डोळे उघडत तर काही वेळेस अगदी थोडे ज्युस घेत. एके दिवशी त्यांनी खुणेनेच सर्वांना जवळ बोलावले व सर्वांकडे डोळे भरून पाहिले. काहीतरी हातवारे करून सांगण्याचा प्रयत्न करीत होते.

त्या दिवशी रात्री बाबांनी अगदी हळू आवाजात टेपवर गीतरामायण लावले होते. गाद्या घातल्या होत्या झोपण्यासाठी पण कोणालाही झोप लागत नव्हती. डॉक्टर एकदा येऊन बघून गेले. मामांची घरघर चालूच होती. एक मंद दिवा चालू होता. आम्ही दोघी या कुशीवरून त्या कुशीवर होत होतो. एकीकडे रडत होतो. आईबाबा डोळ्यात तेल घालून जागे होते. जरा कुठे डोळा लागेल असे वाटले तर दचकायला होत होते. आईबाबांना म्हणाली तुम्ही झोपा जरावेळ मी आहे जागी. रात्रीचे बारा वाजून गेले होते. आई अधूनमधून उठून पाणी पीत होती. आई अंथरूणावर फक्त पाठ टेकण्याकरता आडवी झाली होती. आम्ही दोघी डोक्यावर पांघरूण घेऊन आत रडत होतो. काळ व वेळ जवळ येत चालली होती. पहाटे चारच्या सुमारास अगदी काही क्षण आईला डुलकी लागली आणि त्याच वेळेस घरघर बंद झाली. काही क्षण असेच स्तब्धतेत गेले. आम्हाला सर्वांना झोपवून मामा हळूच दार उघडून निघून गेले होते.......

आईला जाग आली. घरघर बंद झाली होती हे आईला कळलेच. आईने दिवा लावला. मामांचे हातपाय बघितले. हातपाय थंड पडत चालले होते. आईने बाबांना उठवले ‘बरं काहो, मामा गेलेत बहुतेक’ बाबांनीही उठून बघितले. बाबा डॉक्टरांना बोलवायला गेले. डॉक्टरांनी तपासून सांगितले की मामा गेले आहेत. आम्हाला दोघींनाही जाग आली आणि कळून चुकले की

मामा नाहीत. तो क्षण खूप मोठी पोकळी निर्माण करणारा होता. आम्ही दोघी खूप जोरजोरात रडायला लागलो. आईबाबाही खूप रडत होते. कोणालाही अश्रू आवरता येत नव्हते. हळूहळू करत सर्व नातेवाईक आले आणि दुपारच्या २ च्या सुमारास मामांचा पार्थिव देह बाबांनी व काकाने उचलला. मामा शांतपणे पडले होते. त्यांच्या चेहऱ्यावर तेज आले होते. खूप समाधानाने जणूकाही आम्हा

------------*------------

# १२) माझी आजी






माझी आजी म्हणजे आईची आई मला अगदी अंधूक आठवत आहे. गोरी पान, केस पूर्णपणे पांढरे झालेले आणि डोळ्याचा रंग सागरगोट्यांसारखा! साधारण माझ्या आईसारखीच दिसणारी होती. फोनवरून आईने मला आजीबद्दल सांगितले तेच मी इथे लिहीत आहे. आई सांगते की आजीला सावत्र आई होती. ती तिला उपाशी ठेवायची.  शिळंपाकं खायला द्यायची. आजोबा लवकर गेले. आजोबांच्या आजारपणात तिने त्यांची खूप सेवा केली. कधीही तक्रार केली नाही की कंटाळा केला नाही.  दत्तजयंती घरी करायची व अळीतल्या सर्व बायकांना प्रसादाचे जेवायला बोलवायची. आजीला मुलगे बरेच झाले. दोन मुली झाल्या. माझ्या मावशीला सगळे चंपू म्हणायचे. तिच्या लग्नात माझी आई ४ महिन्यांची होती. लग्नानंतर तिच्या एका बाळंतपणात ती वारली. तिच्या सासरचे नाव राधा होते.  माझ्या आईचे माहेरचे नाव रेवती व तिला सर्व बाबी म्हणून संबोधतात. माझी आई सर्वात धाकटी.  मोठा मामा आम्हां दोघी बहिणींना आजोबांसारखाच होता. आई व तिचे आठ भाऊ. आईच्या मोठ्या भावाने सांगितले की मुलगी झाली तरच आम्हाला कळवा!

ओळीने मुलगेच होत होते आजीला. आईला पहायला सगळ्या भावांची रांग लागलेली होती तिला बघायला.

आजीचा सर्वात मोठा गुण होता की ती सर्वांना गरम गरम जेवायला वाढायची. एक पोळी संपली की लगेच दुसरी तव्यावरची पोळी पानात. धुणे भांडी करून आली की तिचा वेळ स्वयंपाकात जायचा. आई तिची लाडकी मुलगी. तिच्याकरता ती प्रेमाने काही ना काही करत असायची. आई शाळेतून आली की तिच्या आवडीचे सर्व करायची. चुलीवरचा भात, गरम गरम आमटी किंवा पिठले करायची. तिच्या आवडीच्या चिकवड्या तळायची. त्याच तेलात आईच्या आवडत्या बटाट्याच्या काचऱ्या करून द्यायची. माझ्या आईला श्रीखंड खूप आवडते. आजी तिच्याकरता घरीच चक्का बनवून त्याचे श्रीखंड करायची. मला लहानपणी गोडाचा शिरा खूप आवडायचा. माझ्यापुरताच छोट्या नैवेद्याच्या वाटीत ती शिरा करायची. मला जेव्हा बहिण झाली तेव्हा आई सांगते आजी म्हणाली की बहीण झाली ते चांगले झाले. बहिणी बहिणींमध्ये प्रेम असते.

माझ्या आजोबांना (बाबांच्या वडिलांना) त्या काळात तिने ५१ रूपये दिले होते. थोडे थोडे करून तिने साठवले होते. आजोबांना म्हणाली की माझे पहिले नातवंड झाले की बाळलेणी करताना माझे पैसे घाला. माडीवाले कॉलनीत रहात असताना ती आईकडे तिच्या पहिल्या बाळंतपणासाठी राहिली होती. मी सव्वा वर्षाची झाले तेव्हा भिकारदास मारूती जवळ एक नारद मंदीर होते तिथे ती मला घेऊन जायची. माझ्या बहिणीच्या बारशाचा सर्व स्वयंपाक आजीनेच केला होता. त्या वेळेला तिला जास्त दिवस रहाता आले नाही कारण तिच्या दुसऱ्या नातीच्या जन्माच्या वेळेस तिला एका मामाकडे जायला लागले. चतुर्श्रृंगीच्या जत्रेत आजी आमच्या बरोबर यायची आणि आम्हां दोघी बहिणींना म्हणायची हवा तितका रस प्या. तिला नातवंड, पतवंड झाले की प्रत्येक नातवाच्या वेळी आजी त्या मामाकडे राहायची. बाळाचे निगुतीने करायची. बाळंतपणात तिच्या सुनांना आराम द्यायची. सर्व स्वयंपाक आजीच

करायची. अशी होती माझी आजी. खूप कष्टाळू आणि प्रेमळ ! वयाच्या ७८ व्या वर्षी तिला देवाज्ञा झाली. तिने तिचे प्राण मोठ्या मुलाच्या घरी सोडले.

------------*------------

